KÂVYASANGRAHA. 32.

# THE MAHÂBHÂRATA

OF

## MUKTES'VARA.

(THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA.)

## 4. VIRÂṬAPARVA.

*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂMA JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS,

Bombay.

1899.

*Price* 6 *Annas.*

काव्यसंग्रह. ३२.

महाराष्ट्रकविवर्यमुक्तेश्वरकृत

# महाभारत.

## ४. विराटपर्व.

हें

अनेक हस्तलिखित प्रतींवरून शुद्ध करून, पुराणेतिहासविषयक
व अवांतर माहितीच्या टीपा देऊन
तयार केलें,

तें

मुंबईंत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

१८९९.

किंमत ६ आणे.

महाराष्ट्र भाषेचें आणि कवितेचें

आस्थापूर्वक अध्ययन

करूं इच्छिणाऱ्या सज्जनांस

हा ग्रंथ

सप्रेम अर्पण करतों.

'काव्यसंग्रह'कार.

# अनुक्रमणिका.

# मुक्तेश्वरकृत महाभारत.

## ४. विराटपर्व.

### अध्याय पहिला.

(ओव्या.)

#### उपोद्घात.

[1]जो श्रेष्ठ बोलिजे [2]श्रेष्ठीं । तो वैसोनी मायादेवीच्या पाठीं ।
ब्रह्मा विष्णु महेश पोटीं । जन्मविलीं बाळकें. ॥ १
कवतुकार्थ ठेवुनी नांवें । रंजवी [3]साकारतेच्या भावें ।
[4]अव्यक्तपालखीं स्वभावें । थापडोनी पहुडवी. ॥ २
तया आदिपुरुषा स्वामी । [5]लीलाविश्वंभर गुरुनामीं ।
नमस्कारोनी [6]मनोधर्मीं । सावध म्हणे श्रोतियां. ॥ ३
आतां चौथें 'विराटपर्व' । [7]नवरससुधेचा सुधार्णव ।
[8]श्रवणेंद्रियांचें वैभव । [9]अतिअभिनव, वदावें. ॥ ४
[10]स्तंभ टेंकों न शके गगनीं, । ठाव न काढवे समुद्रजीवनीं, ।
विश्वंभराचे ग्रंथसदनीं । दूषणश्वान रिघेना. ॥ ५
मूढ [11]अल्पकें बोलें वचनें । तें [12]मत्सरें अथवा नेणतपणें; ।

---

१. जो परमात्मा. २. सत्पुरुषांनीं. ३. मूर्तस्वरूपाच्या. ४. अव्यक्त म्हणजे अव्याकृत (मूळब्रह्मरूपास विकार प्राप्त होण्याच्या पूर्वीची स्थिति). हें अव्याकृत ब्रह्म हीच पालखी (पाळणा) यामध्यें ब्रह्माविष्णुमहेश बालकें यांस थापटून जें ब्रह्म निजवितें. **रूपक** अलंकार आहे. ५. लीलाविश्वंभर हीं उभयतां मुक्तेश्वराचीं मातापितरें होत. ते व त्याचे गुरु यांचे ठायीं कवीची अपरंपार भक्ति होती म्हणून त्यांस आदिपुरुष असें समजून नमन केलें आहे. ६. मनोभावानें. ७. शृंगार, वीर, करुणा, हास्य, रौद्र, भयानक, बीभत्स, अद्भुत व शांत हे नवरस होत. ८. कर्णेंद्रियाचें भूषण. रमणीय वस्तु पाहणें हें जसें नयनाचें भूषण आहे, तसेंच नवरसपूर्ण असें श्रुतिमनोहर कथानक ऐकणें हा कर्णेंद्रियाचा अलंकार, सौभाग्य होय. **रूपक** अलंकार. ९. अपूर्व कथा आहेत ज्यांत असें विराटपर्व. १०. आकाशाला खांब टेंकविणें अगर समुद्राचा अंत काढणें जसें दुर्घट तद्वत्. **असंभव** अलंकार. शेवटच्या दोन चरणांत **रूपक** आहे. ११. अल्पत्व दाखविणारीं, दोष काढणारीं. १२. मूर्ख दूषणें काढितात तीं (१) दुसऱ्याचा उत्कर्ष सहन होत नाहीं म्हणून मत्सरानें, किंवा (२) कळत नाहीं म्हणून अज्ञानानें काढितात.

[1]गुणग्राहीक [2]जीवेंप्राणें । प्रेम करिती या ग्रंथा. ॥ ६
प्रयागीं जान्हवीच्या नीरा । काचकुपिका भरोनि चतुरा ।
कावडी नेती रामेश्वरा । अभिषेकार्थ आवडीं. ॥ ७
तेंवी [3]वेदाब्धी मथुनि, देखा । व्यासें काढिलें [4]अमृतोदका ।
[5]महाराष्ट्रशब्दाच्या कूपिका । भरूनी दिधल्या मज हस्तीं. ॥ ८
प्रसाद पाठविला प्रीती । तो स्वीकारुनी संतश्रोतीं ।
[6]कर्णद्वारा परमभक्ती । [7]हृदयलिंगा सिंचणें. ॥ ९

## कथारंभ.

द्वादशवर्षें अरण्यवास । सरल्यानंतरें [8]कुरुनरेश । दीर्घदृष्टी गुणविशेष । विचार [9]विवरीं तें ऐका. ॥ १० ॥ चौघे बंधू आणी द्रौपदी, । धौम्य विवेकाचा उदधी । [10]त्यांतें म्हणे, ‘विशाळबुद्धी ! । बुद्धिप्रद मज होईं. ॥ ११ ॥ [11]नष्टचर्य अज्ञातवासें । कवणेठायीं क्रमावें कैसें ? । शत्रूंस कळलिया विशेषें । [12]महाव्यसनीं पाडिती. ॥ १२ ॥ जरी [13]अंळुमाळ होईल ठावें । तरी [14]बारा क्रमोनी तेरावें । पुढती लोटतां, स्वभावें । आयुष्य गेलें [15]यांतळीं.’ ॥ १३ ॥ धौम्य म्हणे, ‘विचारसुमती ! । कायसा भ्रमसी चिंतावृत्ती ? । होणार तें प्रारब्धगती । आपोआप होतसें. ॥ १४ ॥ [16]यक्षाचिये वरविशेषीं । रूपें पालटती [17]आपैसीं । नामें पालटावीं कैसीं । तेंही ऐकें नरेंद्रा ! ॥ १५ ॥ [18]कंकनाम ठेविजे धर्मा ! ।

---

१. गुणज्ञ. ‘ग्राहक’ हा आपल्या ‘गिऱ्हाईका’चा जनक ! २. With heart and soul. ३. वेदरूपी समुद्र. ४. भारतरूपी अमृतोदक. ५. मराठीमध्यें ग्रंथरचना करण्याला लोकमताचा केवढा अडथळा होता हें येथील **उपमा, रूपकें** पाहून समजण्यासारखें आहे ! ६. कानाच्या वाटेनें. ७. आत्मारूपी लिंगास. ८. धर्मराजा. ९. खलबत करण्यास आरंभ करी. १०. धौम्यऋषीतें. ११. आमचें दुर्दैव, (साडेसाती) त्याचे दिवस. १२. महासंकटांत. १३. यत्किंचित्, थोडेंसें. १४. बारा वर्षें. १५. याखालीं; याच फेऱ्यांखालीं सर्व आयुष्य संपलें असें होईल. १६. ‘तुमचीं स्वरूपें पालटून तुम्हांला कोणीही ओळखणार नाहीं’ असा धर्मराजास यक्षानें वर दिला होता. १७. आपल्या आपण. १८. मूळ भारतामध्यें धर्मभीमादिकांनीं स्वतःच आपआपलीं नांवें व कर्में सांगितलीं आहेत. ‘कंक’ या शब्दावर पुढील टीका आहे. ‘कंकश्छद्मद्विजे ख्यातो लोहपृष्ठकृतांतयोः (विश्वकोश). स्वस्य कृतांतसूनुत्वेन ‘आत्मा वै पुत्रनामासि’ इति श्रुतेः । तदनन्यत्वात् तन्नाम्नो धारणे मिथ्यावादित्वं न भविष्यतीति भावः ॥.’ सारांश कंक म्हणजे यम, धर्म यमाचा मुलगा म्हणजे यमच, तेव्हां धर्मानें कंक हें नाम धारण केलें, यांत असत्य कांहीं नाहीं हें सांगण्याचें तात्पर्य आहे.

बल्लव[1] अभिधान वळिया भीमा, । घेउनी अंगनेची प्रतिमा[2] । बृहन्नडा[1] अर्जुन! ॥ १६ ॥ ग्रंथिक[1] नाम हें नकुळातें, । तंतिपाळ[1] हें सहदेवातें, । सैरंध्री[1] हें द्रौपदीतें । कृत्रिम नामें पांचारा[3]. ॥ १७ ॥ धर्मराजाचिये घरीं । होतों निजाधिकारीं[4] । ऐसें बोलोनी, विराटघरीं । विराटातें सेविजे. ॥ १८ ॥ लोटलिया अज्ञातसंवत्सर[5] । पुढें करूं आन[6] विचार । राज्यप्राप्तीचा प्रकार । साध्य असाध्य, जाण पां!' ॥ १९ ॥ ऐसें धौम्य अनुवादतां[7] । परम संतोष कुंतीसुतां । ब्राह्मणां, संगियां[8], समस्तां । आज्ञा देवोनी पाठविती. ॥ २० ॥ कोणीं पांचाळदेशाप्रती, । कोणीं सप्तमपुरीं[9] जाती, । कृष्णवसुदेवसंगती । वर्ष एक क्रमावें[10]. ॥ २१ ॥ कोणीं[11] धाडिले हस्तिनापुरा, । खेद आल्हाद कौरवेश्वरा[12] । 'अज्ञातवास युधिष्ठिरा । कोठें कैसें जाणावें?' ॥ २२ ॥ इंद्रसेन[13] रथसहित । सेवक सोयरे परम आप्त । द्वारके धाडिले, कृष्णनाथ । स्नेहभावें

---

१. बल्लव यालाच पौरोगव असा समानार्थक दुसरा शब्द आहे. 'पुरोगुः वायुः तस्य पुत्रः पौरोगवः (भीमः) तस्मात् बल्लवेऽपि वायुसुतार्थवाची.' बल्लव म्हणजे पौरगव म्हणजे वायुपुत्र! तेव्हां येथेंही मिथ्यावादित्वाचा दोष नाहीं. बृहन्नडा (किंवा बृहन्नला. भारतांत बृहन्नला आहे.) यावर हें भाष्य आहे. 'बृहंश्चासौ नरश्च बृहन्नरः । रलयोर्डलयोश्चाभेदाद् बृहन्नलः(डः वा) नारायणसखो आद्यो नरः । स्त्रीत्वं स्वरूपगोपनार्थम् ॥'. मोठा नर म्हणजे आदिनर (नारायणसखा अर्जुन!). ग्रंथिक शब्दाची उपपत्ति पहाः—'ग्रंथान् आयुर्वेदं आध्वर्यवं च वेत्तीति ग्रंथिकः । अश्विनोः सुतत्वात्!' तंतिपाल याची व्यवस्थाः—'तंतिः वाक् तस्याः पालः वाक्पालः धर्मवचनार्थानुष्ठाता' (धर्माची आज्ञा मानून तिच्याप्रमाणें चालणारा). वाणी (लमाण) लोक ज्या दावणीमध्यें बैल बांधतात तिलाही तंति म्हणतात! सैरंध्री 'अंतःपुरपरिचारिका राजभार्या वा' असें नांव घेतलें तरी तें राजभार्येला लागू पडतें म्हणून अन्वर्थकच होय. २. रूप. ३. बोलवीत जा, हांका मारा. ४. आपआपल्या कामावर, स्वतंत्रपणें. 'नियोग अधिकारी' असा अन्य प्रतींचा पाठ. ५. आपण कोण आहों, हें इतरांस कळूं न देतां घालविण्याचें वर्ष. 'Incognito' याचा अर्थ हाच आहे. ६. दुसरा, आणखी. ७. बोलल्यावर. मूळचा अर्थ (१) 'दुसऱ्याचें भाषण आपण म्हणणें, (२) दुसऱ्याचे दोष सांगणें, हा आहे. 'बोलणें' येवढाच येथें अर्थ. ८. सोबती, अनुचर. ९. द्वारावती अगर द्वारका नगरींत. १०. घालवावें यासाठीं. ११. कोणांस, कित्येकांस. 'कोणां' असतें तर बरें झालें असतें. तृतीया विभक्तींत कर्म असणें संभवत नाहीं. १२. युधिष्ठिराला अज्ञातवास प्राप्त झाला, म्हणून दुर्योधनास कांहीं आनंद झाला व 'तो कोठें आहे व त्याला कैसें जाणावें?' अशी कांहीं चिंता उत्पन्न झाल्यामुळें त्यास खेद झाला. १३. धर्मराजाचा सारथी.

पाळितू.[1] ॥ २३ ॥ द्रौपदीच्या परिचारिका[2] । सखिया वेशिया[3] अनेका । धृष्टद्युम्नें घेउनियां सुखा । पावविल्या, सुरवाडें.[4] ॥ २४ ॥ अग्निहोत्र सामग्रीसीं[5] । धौम्य जातां पांचाळदेशीं[6] । नीती सांगे पांडवासी । विराटसंगीं बसावया. ॥ २५ ॥ 'नाम, रूप, थोरपण । कोणा कळों न द्यावें ज्ञान;[7] । दीनाहूनी परम दीन । ऐसें लोकां दाखवावें. ॥ २६ ॥ दावुनी चातुर्य कुशळते । मूर्खत्व नाणिजे[8] प्रभूतें;[9] । श्रेष्ठ बोलिजे न घडे तें । तेचि शब्दीं प्रतिष्ठा. ॥ २७ ॥ असत्य न बोलिजे सर्वथा, । धरिजे निर्लोभ निर्मळता,[10] । इंद्रियनियमीं[11] नित्य वसंतां । तोचि वल्लभ रायातें. ॥ २८ ॥ राजस्त्रीसंवाद, । राजमित्राशीं विरोध, । राजपुरोहितासीं विनोद, । जाणते पुरुषीं न करावा. ॥ २९ ॥ राजा अचाट काम सांगे । न करवे म्हणोनी न येइजे[12] मागें; । स्वभाव वोळखोनि जो वागे । तोचि वल्लभ रायातें. ॥ ३० ॥ मागां[13] सरे अंतःपुरीं, । पुढां ठाके रणचत्वरीं, । दिधली आज्ञा वंदी शिरीं । तोचि वल्लभ रायातें. ॥ ३१ ॥ कीजे सर्वांचें आर्जव । कोठें न दाखवी वक्रभाव,[14] । सर्वांपासोनी गौरव[15] । तोचि पावे निर्धारें. ॥ ३२ ॥ करणी[16] करूनियां लपवी, । महिमा दुजियाची वाढवी, । महायशाची[17] तो पदवी । आपेंआप पावतू. ॥ ३३ ॥ रायें नेमिलिये व्यापारीं । सावधान अहोरात्रीं । आळस निद्रा दवडूनि दूरी[18] । तोचि रायातें आवडे. ॥ ३४ ॥

---

१. 'पाळील' या खातरीनें. २. दासी. ३. वेश्या. मूळांत 'वेश्या'वाचक शब्द नाहीं. ४. पांडवाचे पोवाडे गाऊन. ५. सामग्रीसह. ६. द्रुपदाच्या राज्यांत. ७. नामरूपाचें ज्ञान. ८. नाणिजे, न आणिजे=आणूं नये. विध्यर्थी प्रयोग आण या धातूचा. (गोडबोलेकृत व्याकरण–पृष्ठ ९३ आवृत्ति दुसरी). ९. राजाहून आपलें शहाणपण जास्त आहे, असें दाखवूं नये. प्रभूवर मूर्खत्वाचा दोष येईल असें करूं नये. १०. मनाची शुद्धता. ११. इंद्रियांचें दमन करून जो असतो तो. १२. स्वामीनें कोणतीही आज्ञा केली असतां 'माझ्यानें काम होत नाहीं' म्हणून कधींही मागें येऊं नये. कसलें अचाट (मोठें) काम सांगितलें तरी तें करावें–हा भावार्थ. सेवकांनीं ही वृत्ति धारण केली व स्वामी गुणग्राहक असले म्हणजे वाटेल तें काम 'हां हां म्हणतां उठून जाईल' यांत काय आश्चर्य आहे? १३. अंतःपुराकडे (स्त्रिया राहतात तिकडे) जाण्याचा प्रसंग आल्यास मागें सरणारा व रणांगणामध्यें पुढें पाऊल टाकणारा. सामान्यतः सुखाचे वेळीं मागें व कामाचे वेळीं पुढें असणारा सेवक असावा. राजाच्या अंतःपुरांत न जाणें हें अर्थातच स्वामीभक्तीचें उत्कृष्ट चिन्ह होय. १४. वांकडेपणा. १५. मोठेपणा मिळवितो. १६. स्वतः सुकर्म करून त्याचें श्रेय दुसऱ्यास देणाऱ्या नरवरासच 'महादेव' हें नांव शोभतें. १७. मोठ्या यशाची. १८. 'जो राहतो' हे शब्द अध्याहृत आहेत.

झालिया मानापमान । हर्षविषादीं न घालीं मन, । क्षमाशील, सुप्रसन्न । तोचि पावे महिमेतें. ॥ ३५ ॥ [1]राजपैशून्य नायके कानीं, । राजनिंदा न बोले वदनीं, । [2]राजमान्यांतें सन्मानी । तोचि मान्य नृपातें. ॥ ३६ ॥ पुसिल्याविणें न करी काज, । संतुष्टकाळीं न [3]मनीं लाज, । राजगौरवें न चढे [4]मांज । तोचि पावे महिमेतें. ॥ ३७ ॥ प्रभूनें बोलविल्या बोलणें, । प्रभू पुसेल तें सांगणें, । न पाचारितां न जाणें । तोचि पावे प्रतिष्ठा. ॥ ३८ ॥ राजासनीं, राजवहनीं, । राजाचिया एकांतसदनीं, । [5]बैसका न करी तो [6]षड्गुणी । मान पावे नृपाचा. ॥ ३९ ॥ आपलें प्रगटूं नेदी ज्ञान, । नेणत्यातें न म्हणे जो अज्ञान, । ज्याचिये मुखीं मधुर वचन । तोचि [7]मान्य विश्वातें. ॥ ४० ॥ असो तुम्हां जाणत्यांप्रती । काय बोलणें [8]बहुसाळ युक्ती? । सांगीतलें तया रीतीं । अज्ञातवास क्रमावा. ॥ ४१ ॥ हृदयीं धरूनी कृष्णमूर्ती । स्मरणही असावें अहोरात्रीं । त्रयोदश वर्षांचिये अंतीं । शीघ्र भेटीस [9]येतसों.' ॥ ४२ ॥ ऐसें सांगून कुरुनरेशा । धौम्य गेला पांचाळदेशा. । धर्म म्हणे, 'विचार कैसा? । पुढें करणें बंधु हो! ॥ ४३ ॥ अज्ञातवास परगृहवस्ती । उदरनिर्वाह कैशा रीती?' । पांच ही म्हणती, '[10]ये अर्थीं । संकट कांहीं असेना.' ॥ ४४ ॥ धर्म म्हणे, 'वदेन वाचा । सभापंडित मी पांडवांचा, । जाती ब्राह्मण, सद्विद्येचा । संग्रह असे मजपासीं. ॥ ४५ ॥ [11]रत्नपरीक्षे मी कुशळ, । खेळूं जाणे द्यूतखेळ, । [12]बुद्धिबळें पुरुष सबळ । मजसमान असेना. ॥ ४६ ॥ वस्तुपरीक्षा, राजनीती, । [13]समयीं जाणे

---

१. यजमानाचे दोष. २. राजानें मान दिलेले ते राजमान्य. ३. मनामध्यें. मानी असा अर्थ केल्यास अनुस्वार नको. ४. उन्मत्तपणा. ५. बैठक. ६. धैर्य, बुद्धि, बळ, उद्योग, पराक्रम व साहसकर्म हे पुरुषाचे षड्गुण सांगितले आहेत. ७. येथें सेवकाचीं जीं लक्षणें सांगितलीं आहेत तीं किती योग्य आहेत व कशीं अनुभवप्रणीत आहेत हें आमच्या लोकांस सांगावयास नकोच. जोंपर्यंत सेव्यसेवकधर्म कायम आहे–आणि बुद्धिवैचित्र्य व प्रसंगवैचित्र्य आहे तोंपर्यंत हा धर्म कोणत्या तरी रूपानें कायम राहणारच–तोंपर्यंत ह्या वर सांगितलेल्या गोष्टींचें परिपालन उत्कृष्ट तऱ्हेनें करणें हें प्रत्येक सेवकाचें कर्तव्य आहे. ८. पुष्कळ प्रकारच्या. ९. येत असों, येत आहोंच; येणार आहोंच. भविष्यकाळ वर्तमानकाळाच्या रूपानें दाखविणें ह्या प्रसंगीं फारच समर्पक होय. 'एक वर्ष हां हां म्हणतां निघून जाईल' ह्याचें हें दर्शक आहे. १०. या कामांत. ११. परीक्षेमध्यें. १२. माझ्या इतकें बुद्धीचें सामर्थ्य आहे असा समर्थ पुरुष. १३. समयाला, कठिण प्रसंगीं, काय करावें याची युक्ति मला सहज सुचते; अगर सहवास झाल्यावर तुम्हास सहज समजेल.

विचारयुक्ती । सहज, झालिया संगती, । जाणवेल स्वभावें. ॥ ४७ ॥ बोधोनियां नृपाचें मन । बुद्धी[1] क्रमू काळ कठिण.' । भीम म्हणे सुप्रसन्न[2], । 'मीही करीन मज साजे[3] तें. ॥ ४८ ॥ पाककर्ता बल्लव नामा । धर्मा घरीं सूपकर्मा[4] । भक्ष भोज्य अमृतोपमा । निपजवीं स्वहस्तें. ॥ ४९ ॥ भीमासंगीं निर्दोष[5] । शरीरीं केला बळअभ्यास । तोही दाखवुनी, उल्हास । उपजवीन रायातें. ॥ ५० ॥ ऐसें बोलतां चमत्कार[6]। अंगिकारिल[7] राजेश्वर.' । अर्जुन म्हणे, 'हो ! विचार । आमुचाही परियेसा. ॥ ५१ ॥ वर्ष एक उर्वशीशापू[8] । तो पैं करावया निर्लेपू[9] । अंगीं अवंगोनी[10] अंगनावपू । राजयातें भेटणें. ॥ ५२ ॥ नाटकशाळेचिया[11] कुमरी । नाचवूं जाणें कळाकुसरीं । सारथ्यविद्या यांपरी[12] । अर्जुनसंगें लाधली. ॥ ५३ ॥ पार्थ करितां शरसंधान । नेमें निश्चयें लक्ष्यभेदन[13] । दृष्टी पाहतां झालें ज्ञान । त्या सद्गुरूप्रसादें[14]. ॥ ५४ ॥ ऐशा वदूनियां गोष्टी । काळ क्रमूं तयांनिकटी[15].' । नकुळ म्हणे, 'माझिया गांठी[16] । शालिहोत्र[17], धनविद्या. ॥ ५५ ॥ अश्व नाचवणें निगुती, । फेरे फिरवणें चक्राकृती, । शीघ्र पळविणें वातगती[18], । ऐसी कळा दावणें. ॥ ५६ ॥ वारु चालवणें गगनीं, । तरोनि जाणे समुद्रजीवनीं, । ऐसें चोजें[19] दावोनि[20] नयनीं[21] । प्रिय(भृत्यत्व) करणें रायाचें.' ॥ ५७ ॥ सहदेव म्हणे, 'म्हैशी-धेनू-। वृषभ-दमनीं[22] अतिसुजाणू, । दोहनीं, मथनीं परमनिपुणू।

---

१. बुद्धीनें. बुद्धीच्या जोरावर हे विपत्तीचे दिवस घालवूं. कठिण प्रसंग प्राप्त झाला असतांही बुद्धिकौशल्यानें आनंदपूर्वक व ईश्वरचरणीं निष्ठापूर्वक रहावयाचें व संकटाचें निरसन करून आपलें कर्तव्य करावयाचें हेंच धर्माचें मूल बीज आहे आणि यासच आपण या कलियुगांत आंचवलों आहों ! २. प्रसन्न (आनंदयुक्त) मनानें. ३. योग्य असें तें. 'मज साजे तें' याच्या ऐवजी 'मच्छातें' असा पाठ आहे. या पाठाप्रमाणें 'मच्छराजास प्रसन्न करीन' असा अर्थ होईल. ४. सुखेन पीयते, इति सूपः. ५. हिंसा ज्यांत नाहीं असा बळ अभ्यास, कुस्तीचा (मल्लयुद्धाचा) अभ्यास. ६. आश्चर्य उत्पन्न करण्याजोगें; कुतूहलजनक. ७. माझा स्वीकार करील. ८. इंद्रलोकीं असतां अर्जुनानें उर्वशीस झिडकारून आपलें परस्त्रीविषयक पराङ्मुखत्व प्रकट केलें म्हणून त्यास उर्वशीनें शाप दिला होता; त्यामुळें त्यास एक वर्ष क्लीबत्व प्राप्त व्हावयाचें होतें. ९. नाहींसा. १०. घेऊन. ११. अंतःपुरांतील. 'नाटकशाळा' म्हणजे 'उपस्त्रिया' असाही अर्थ इतर ठिकाणीं होतो. १२. याप्रमाणेंच. सर्वकळा आल्या त्यांत सारथ्यविद्याही प्राप्त झाली. १३. लक्ष्यभेदन=विनचुक निशाण मारणें. १४. अर्जुन गुरु त्याच्या कृपेनें. १५. विराटगृहीं. १६. पदरीं; ताब्यांत. १७. अश्वविद्या. १८. वायुवेगानें. १९. चमत्कार. हल्लींच्या 'सर्कस'ची कोणास आठवण होणार नाहीं? २०. दाखवून. २१. प्रत्यक्ष. २२. यांना ताब्यांत ठेवण्यामध्यें.

शिष्य होय कृष्णाचा.' ॥ ५८ ॥ ॥ कृष्णा म्हणे, 'मी सैरंध्री । पांचाळीची शुश्रूषा[1] करीं, । विराटभार्या गुणसुंदरी[2] । आराधीन सुदेष्णा. ॥ ५९ ॥ ऐशिया रचुनियां उपाया[3] । काळ कंठूं धर्मराया !' । मग स्मरोनी श्रीकृष्णपाया[4] । साहीजणें चालिलीं[5]. ॥ ६० ॥ पुढें चालतां जगजेठी[6] । विराटनगराचिया पाठीं[7] । श्मशानभूमिकेच्या[8] निकटीं । विशाळ वृक्ष शमीचा. ॥ ६१ ॥ अर्जुन म्हणे, 'शस्त्रास्त्रें । येथें ठेवावीं, सुपवित्रें[9]; । अभिमंत्रितां महामंत्रें । दृष्टी[10] कोणा न पडतीं. ॥ ६२ ॥ खडतर[11] मंत्रबीजाचें रूप । पाहातया दिसतीं[12] सर्प, । भयें पाहुनियां[13] कंप । स्पर्शों कोणी न शकती. ॥ ६३ ॥ खड्गवल्ली[14] तूणीरचापें[15] । प्रळयपावकाचीं रूपें । पाहातां सूर्याचिये ओपें[16] । झांकुळती[17] स्वप्रभा. ॥ ६४ ॥ मृगचर्में वेष्टुनियां निगुतीं । नकुळें ठेविलीं वृक्षावरुतीं । जीं कां आणिकांचे हातीं । साध्य न होती सहसा[18]. ॥ ६५ ॥ वृद्धस्त्रियेचें कलिवर[19] । तेथें बांधिलें भयंकर, । दुर्गंधिस्तव नारी नर । समीप कोणी नच येती. ॥ ६६ ॥ नगरप्रवेशीं नरशार्दूलें[20] । दुर्गाप्रासाद देखिला डोळें[21], । अंबा भगवती विशाळें । लोटांगणीं[22] वंदिली. ॥ ६७ ॥ धर्मराज करी स्तवन, । 'विश्वमाते! तूज नमन; । तुज वेगळें ब्रह्म आन । हें[23] सर्वथा घडेना. ॥ ६८ ॥ ब्रह्मा, शंकर आणी

---

१. द्रौपदीची सेवा. २. सुंदर गुण आहेत जीचे अगर गुणानें सुंदर आहे ती. ३. अशा प्रकारचे उपाय (युक्त्या) निर्माण करून. ४. भगवत्पादांचें स्मरण करून. 'अहो येतां जातां' हा वामनी श्लोक; भगवद्गीता अध्याय ५ श्लोक ८ व ९ हे पहा. 'यत्र योगेश्वरः कृष्णो' हाही श्लोक पहावा. भगवंताचें स्मरण करून कर्तव्य केलें असतां समाधान होतें, हा सिद्धांत आहे. ५. विराटनगरीकडे. विराटराजा मत्स्यदेशाचा राजा होता. ६. जुनाट? शमीवृक्षाकडे संबंध आहे काय? ७. पाठीमागें. ८. 'श्मशान' हें स्वरूप खरें, श्मन्=शरीर. त्याच्या विश्रांतीची जागा तें 'श्मशान.' रूढी 'स्मशान' म्हणण्याची आहे. 'मसण' हा अपभ्रंश होय. ९. चांगल्या रीतीनें पूत अशा. १०. दृष्टीस=नजरेस. बोलतांना व लिहितांना 'स'चा लोप होतो. ११. तापदायक. 'पठ'शब्दापासून हा शब्द आला आहे. पठतर=खडतर. १२. शस्त्रें सर्परूपी दिसतील. १३. 'पावुनियां' असतें तर चांगलें. १४. असिलता, तरवार. १५. भाता व धनुष्य. १६. ओपें=प्रकाशानें. कोशांत हा शब्द स्त्रीलिंगीं दिला आहे. १७. मंदतेज होतात. १८. कधींही. १९. कलेवर=प्रेत. २०. नगरप्रवेश करितांना नरश्रेष्ठ धर्मराजानें. २१. डोळ्यांनीं. ही तृतीया लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. सर्वत्र 'प्रसाद' हा पाठ आहे. 'प्र'चा 'प्रा' आम्हीं केला आहे. २२. साष्टांग नमस्कार घालून. २३. तुझ्या व्यतिरिक्त दुसरें ब्रह्म असणें हें संभवत नाहीं. तूंच ब्रह्म आहेस.

हरी । बाळकें जन्मलीं तुझे उदरीं, । वर्ततीं आपुले[1] व्यापारीं । तुझी[2] आज्ञा जननिये! ॥ ६९ ॥ तुझी आज्ञा भंगितां देख । ब्रह्मा झाला[3] चतुर्मुख, । लिंगपतन[4] त्र्यंबक । [5]कपाळपाणी त्वां केला. ॥ ७० ॥ [6]विष्णू देउनी बहु सोंगें । फिरविसी तूं स्वयें आंगें, । लागतां [7]वृंदेचिया मागें । स्मशानवासी त्वां केला. ॥ ७१ ॥ [8]शक्राआंगीं पडलीं भगें, । [8]शशांक व्यापला क्षयरोगें, । तो तुझे [9]नी आज्ञाभंगें । [10]अविधीमार्गें वर्ततां. ॥ ७२ ॥ करूं नये तें कर्म करणें, । [11]सृष्टीवर्जित [12]राहाटणें, । तेचि तुझी अवज्ञा जाणे । वेदवचन, यथार्थ. ॥ ७३ ॥ तो आमुतें घडला दोषू । म्हणोनी भोगूं [13]अरण्यवासू; । आतां उगवोनि कृपादिवसू । निशी[14] नाशीं आ(अ?)वदशा. ॥ ७४ ॥ जें जें व्यक्ताव्यक्त दिसे, । तें तें तुझें स्वरूपचि असे. । [15]तुझेनीच एके [16]अंशें । विश्व सगळें [17]चालिजे. ॥ ७५ ॥ [18]तारा तूंची उक्ता [19]आगमीं । गौरी भगवती [20]शैवधर्मीं, । 'वज्रा देवी' यया नामीं । कौळि[21]काचारें बोलिजे. ॥ ७६ ॥ जैन म्हणती, 'पद्मावती', । 'त्रिपदा गायत्री' देवें[22]मती, । [23]सांख्य बोलती तुजप्रती । 'आदिशक्ती' [24]व्यापके! ॥ ७७ ॥ अवतार धरूनी गोकुळीं । जन्मलीसी नंदकुळीं, । कंस-

---

१. उत्पत्ति, स्थिति व लय हे व्यापार. २. तुझ्या आज्ञेनें. ३. ब्रह्मदेवास पांच मुखें प्रथम होतीं अशी कथा आहे. ४. लिंगभ्रंश पावला. ५. भिक्षापात्र आहे हातांत ज्याच्या तो, शंकर. ६. द्वितीया विभक्ति आहे. ७. शंखचूड असुराची स्त्री. हिलाच तुलसी म्हणतात. शंखचूडाचा पराभव होईना म्हणून देवकार्यार्थ विष्णूनें शंखचूडाचें स्वरूप धारण करून तुलसीस पातिव्रत्यभ्रष्ट केलें. त्या तुलसीकृत पातकानें शंखचूड मरण पावला. विष्णूवर तिची प्रीति होती तरी देवब्राह्मणांच्या साक्षीनें लग्न झालेल्या पतीचा परपुरुषसंगमानें आपण अनादर केला हें पाहून तिनें विष्णूस 'तूं शिला हो' असा शाप दिला. मताविरुद्ध लग्न झालें असतांहीं विधिपूर्वक पाणिग्रहण झालेल्या पतिनिष्ठत्वाचें हें उत्तम उदाहरण आहे. ८. ही सर्व मंडळी परयुवतीच्या अपहरणानें शापबद्ध झालेली आहे. काय कामदेवाचा जबरदस्त झपाटा हा! ९. नि=खरोखर. १०. शास्त्रविरुद्ध. ११. लोकविरुद्ध. नैसर्गिक नियमांच्या उलट. १२. रहाटणें=वागणें. रहा=रीति या फारसी शब्दापासून 'रहाटणें' शब्द उत्पन्न झाला. १३. अरण्यवास प्राप्त झाला तो आपल्याच अपराधामुळें होय ही धर्माची समजूत किती उन्नतिप्रद आहे? १४. दुर्दैवाची रात्र, अवदशेची रात्र. रूपक आहे. १५. तुझ्याच. १६. एका कळेनें. १७. चालतें जातें, चालतें. (कृ० शा० गो० कृत व्याकरण—पृष्ठ ९२, आवृत्ति दुसरी.) १८. बृहस्पतीची पत्नी. ही उमाच अवतरली होती. १९. वेदामध्यें. २०. तीच शिवधर्मामध्यें गौरी. २१. वामपंथानें देवीची आराधना करणारे लोकांचा मार्ग. २२. देवांच्या मतानें. २३. प्रकृति व पुरुष हीं दोन आदितत्वें आहेत असें म्हणणारे सांख्य. २४. सर्व विश्व व्यापणारे देवि! येथपर्यंतचा मजकूर मुक्तेश्वराच्या कविप्रतिभेनें निर्माण झाला आहे.

कुळा करूनी होळी । [1]चैद्य [2]मागध आटिले.' ॥ ७८ ॥ ऐकोनि धर्ममुखींची स्तुती । [3]प्रत्यक्ष झाली भगवती । [4]मौळ स्पर्शोनियां हातीं । आश्वासीत सुवाचा. ॥ ७९ ॥ 'वर्ष एक वसिजे येथें, । वैरी पावती अपजयातें; । पुढें भोगाल मेदिनीतें। [5]सागरान्त [6]एकाज्ञा.' ॥ ८० ॥ अभय देऊनियां हातीं । लोचना [7]अगोचर भगवती. । पुढें राजसभेप्रती । धर्मराज पातला. ॥ ८१ ॥ वदोनियां आशीर्वचन । म्हणे, 'राया! स्वस्ति! कल्याण!' । भूप म्हणे, 'कोठील? कोण? । किमर्थ येणें या [8]ठाया. ॥ ८२ ॥ दिससी सूर्याहून [9]आगळा, । आंगीं ऐश्वर्याची कळा, । पृथ्वीचिया [10]भूपाळा- । श्रेष्ठ, आगळा भाससी.' ॥ ८३ ॥ धर्म [11]अनुवादे हांसोन, । '[12]व्याघ्रपादशाखीं माझें जनन, । [13]अत्रिगोत्री मी ब्राह्मण । होय आश्रित धर्माचा. ॥ ८४ ॥ [14]सभापंडित धर्मानिकट । पांडव [15]झालिया राज्यभ्रष्ट । तूं परम धार्मिक, श्रेष्ठ, । ऐकोन आलों तुजपाशीं. ॥ ८५ ॥ चारी वेद साही शास्त्रें । परिश्रम असे [16]अंगमात्रें । उपासना [17]मंत्रतंत्रें(त्रीं) । [18]बुद्धी कुंठित असेना. ॥ ८६ ॥ खेळूं जाणे द्यूतखेळ, । सत्यभाषणीं न पडे [19]चळ, । [20]रत्नपरीक्षे मी कुशळ, । कंक नाम पैं माझें. ॥ ८७ ॥ जाणे [21]वस्तूंची परीक्षा । बहु काय बोलूं? विचारदक्षा!' । राजा म्हणे, 'मज अपेक्षा । संगतीची [22]पैं असे. ॥ ८८ ॥ आसन वसन मान धन । विद्येसारिखें [23]निवेदीन. । आतां स्वस्थ करूनियां मन । मजसंगतीं असावें.' ॥ ८९ ॥ [24]अनुवादोनी स्नेहें गोष्टी । [25]बैसविला आसनानिकटी; । पुढती चोज देखे दृष्टी । सभास्थानीं नरेंद्र.

---

१. शिशुपाल. २. जरासंध. ३. प्रकट. ४. मस्तक. ५. सागर आहे सीमा जीची अशी पृथ्वी. ६. एकचक्री राज्य आहे जेथें अशा. 'एकाची आज्ञा' असाही अर्थ होईल. ७. अदृश्य झाली. ८. 'स्थान'शब्दाचा अपभ्रंश. ९. श्रेष्ठ. १०. पृथ्वीपतीहून श्रेष्ठ. ११. बोलता झाला. १२. व्याघ्र इव पततीति व्याघ्रपाद् यमः तस्य शाखायां कुले. यमाच्या कुलामध्यें. 'व्याघ्रपाद-गोत्रीं' असें मुळांत आहे. १३. 'अत्रि आणि सर्वांशी मैत्री.' हें गोत्र अजातशत्रु जो धर्म त्यास अनुरूपच आहे. १४. सभासद. १५. झाल्यामुळें. १६. अंगोपांगांसह, सांग. 'आगममंत्रीं' असाही पाठ आढळतो. १७. मंत्रतंत्रांमध्यें. तृतीया विभक्ति दिसते, परंतु सप्तमीसारखा उपयोग आहे! 'निरंकुशाः कवयः' म्हणावें झालें. १८. सर्व विषय माझ्या बुद्धीस गोचर आहेत असें कंक म्हणत आहे. १९. 'चल=अतिक्रमण' या शब्दापासून. सत्यापासून कधीं मी भ्रष्ट होत नाहीं. २०. सप्तमी विभक्ति आहे. 'मध्यें' हा अर्थ. २१. रत्नादिक वस्तूंची. २२. खरोखर. २३. अर्पण करीन. नैवेद्य ह्या शब्दाचा अर्थ जगविश्रुत आहेच. २४. पृ० ८ टी० २८ पहा. २५. धर्मास राजानें राजासनाजवळ बसविलें.

॥ ९० ॥ [1]कनकमेरूतुल्य [2]सरळा । हातीं कवळिलें प्रचंड मुसळा । [3]दर्वी खोविली कटिमंडळा । पोळि[4]कायंत्र [5]सुढाळें. ॥ ९१ ॥ जो[6]हारुनी नरेंद्रोत्तमा । म्हणे, 'बल्लव मी सूपकर्मा, । धर्माघरीं उत्तमोत्तमा । भक्षभोज्या निपजवीं. ॥ ९२ ॥ लेह्य, पे[7]य, खाद्य, चोष्यें, । अन्न परमान्नें [8]पायसें, । शाखा कथिकाच्या सुवासें । वेध लावी [9]वसंता. ॥ ९३ ॥ भीमसेनाचे संगतीं । बळाभ्यास अहोराती । करितां, मल्लाचिये पंक्ती । मान दीजे [10]बळिष्ठीं. ॥ ९४ ॥ आतां देओनियां पो[11]टीं । घेई पाकक्रियांच्या कष्टा, । आणीकही नरेंद्रश्रेष्ठा । करणी दावीन पुढारी.' ॥ ९५ ॥ अवश्य म्हणओनी राजेश्वर । पाकक्रियेचा अधिकार । देऊनि [12]बल्लववृकोदर । पाकशाळे स्थापिला. ॥ ९६ ॥ [13]चीर, कंचुकी, करकंकणें, । श्रवणीं [14]तोटंक भूषणें, । [15]चारुवेषी, दिव्यांजनें । नेत्रकमळीं शोभती. ॥ ९७ ॥ ऐसें [16]अवगोनी अंगनारूप । [17]सभे पातला अर्जुनभूप; । राजा म्हणे, '[18]लावण्यदीप । कोण कोठील [19]उजळला? ॥ ९८ ॥ नेणवे पुरुष किंवा नारी, । प्रभा

---

१. सुवर्णपर्वतासारखे व सरळ. २. मुसळाचीं विशेषणें. ३. पळी. ४. पोळिपाट. ५. सुरेख रीतीनें. भीमदादा कसे सुरेख बल्लव दिसले असतील? ६. जोहार करून. 'जय हर' यापासून हा शब्द निघाला म्हणतात. 'योद्धार:' हाही मूळ शब्द म्हणून दिला आहे. राजास जोहारणें म्हणजे 'अहो योद्धार: (शूर महाराज)' असें म्हणणें. 'जोहारा' चा 'रामराम' रामदासाच्या सांगण्यावरून शिवाजीनें केला हें सर्वविश्रुत आहेच. जोहार करून म्हणे. ७. पेय. खाद्य, पेय, लेह्य, चोष्य हीं चार प्रकारांनीं खाण्याचीं अन्नें आहेत, म्हणून या सर्वांस 'चतुर्विध अन्नें' म्हणतात. ८. क्षीर, खीर. ९. ज्या ऋतूमध्यें सुवासाचा घमघमाट सुटत असतो अशा पसंत वाटणाऱ्या वसंतासही वेध लावील, वेडें करील, असा सुवास मी भाज्या कोशिंबिरींमध्यें उत्पन्न करून तुला संतुष्ट करीन. **व्यतिरेक अलंकार** आहे. वसंतापेक्षां भाज्यांचा सुवास जास्त आहे असें सांगून भाज्यांचा गौरव केला आहे. भीमपाक व नलपाक हे प्राचीनकालीं अत्यंत प्रसिद्ध होते. १०. मोठ्या बळवान् पैलवानांनीं मला मान द्यावा असें सामर्थ्य भीमसंगतीनें मला प्राप्त झालें आहे. ११. 'पोटा दे' ही म्हण प्रचारांतील आहे. १२. बल्लवाचा वेष धारण करणारा भीमसेन. याची भूक शांत होणें लांडग्यासारखें कठिण म्हणून यास 'वृकोदर' नांव होतें. वृकोदर हें नांव रोमचा संस्थापक रॉम्यूलस् यास होतें; पण वृकीनें त्याचें पोषण केलें होतें म्हणून होय. १३. स्त्रियांचें वसन लुगडें. चिरडी हा शब्द 'चीर' शब्दापासून झाला आहे. १४. तानवडे, कर्णभूषणें. १५. सुंदर वेष आहे जिचा. 'चारुवेणी' असाही पाठ आहे. १६. घेऊन. १७. सभेस आला. १८. सौंदर्यप्रकाश. १९. 'उज्वल' शब्दाचा अपभ्रंश होऊन 'उजळणें' हें क्रियापद झालें. आपल्या 'उजळणी'चें हेंच गोत्र!

न [1]समाये पृथ्वीवरी, । स्त्रीत्व [2]लोपोनी, बाहेरी । पुरुषतेज विराजे.' ॥ ९९ ॥ 'राजा धर्माचिये घरीं । [3]नाटकशाळें नाचवी नारी, । गायनें शिकवी [4]रागोद्धारीं । गीतप्रबंध सुतालें. ॥ १०० ॥ अर्जुनसंगें बैसतां रथीं । वारू वागविले हातीं । युद्धीं नानागती, ये [5]गती । सारथ्यविद्या लाधली. ॥ १०१ ॥ [6]खांडवदहनादि अर्जुनयुद्धें । [7]दृष्टी देखिलीं म्यां विविधें,। पार्थगुरूच्या प्रसादें । संग्रामकळा [8]जोडली. ॥ १०२ ॥ [9]संगें असतां, [10]संमयीं । कळों येईल, सांगणें कायी?' । राजा संतोषोनी हृदयीं । सर्वस्वदानें [11]बोळला. ॥ १०३ ॥ तोषोनियां [12]अमृतोत्तरीं । नाटकशाळेचिया नारी । स्वाधीन करूनियां, अधिकारीं । बृहन्नडा ठेविली. ॥ १०४ ॥ प्रतापी (प्रचंड?) चाबुक धरूनी हातीं । नकुळ बोले राजयाप्रती, । '[13]अश्वविद्याकर तया संगती । [14]राउतविद्ये कुशळरूप. ॥ १०५ ॥ [15]कडोविकडी नाचवणें, । [16]झोंला, चौपाटा फिरवणें, । पळवणें, टिकवणें, उडवणें, । आवरणें मुखसंज्ञा, ॥ १०६ ॥ वारू चालवणें [17]निराळीं, । बैसोनी तरिजे सिंधुजळीं, । सहस्र रथियांची मंडळीं । एके रथीं [18]विभांडीं. ॥ १०७ ॥ [19]थोडकी, या राजगुरू । जाणोनी, पाळी युधिष्ठिरू. । तो गेलिया, तव [20]आंधारू । धरूनी, आलों तुजपाशीं.' ॥ १०८ ॥ हृदयीं कवळुनियां भूपाळें । स्वामित्व दिधलें अश्वशाळे. । सहदेव म्हणे, 'माझिये [21]केळे । [22]नावेक दृष्टी विलोका. ॥ १०९ ॥ धर्माघरीं-

---

१. मावत नाहीं. २. लुप्त होऊन. स्त्रीत्व नाहींसें होऊन. ३. नृत्यगायन शाळेमध्यें. येथें 'न'काराचा **अनुप्रास** आहे. ४. निरनिराळ्या रागांतील. ५. या मार्गानें. 'विगति' असा प्रशस्त पाठ अन्यत्र आढळतो. ६. अग्निदेवतेचें अजीर्णशमन करण्यासाठीं अर्जुनानें खांडववन अग्नीस समर्पण केलें होतें. त्या वेळीं इंद्रादिक देवांशीं युद्ध करावें लागलें होतें. वसति करण्यासाठीं वनें अग्निसात् करण्याची तर ही पांडवांची युक्ति नसेल ना? ७. डोळ्यांनीं. ही तृतीया चिंतनीय आहे. ८. युद्धकलेसहित सारथ्यविद्या जोडिली. ९. तुझ्या संगतीस राहिल्यावर. १०. प्रसंग पडला असतां. ११. मागेल तें देण्याइतका प्रसन्न झाला. १२. अमृततुल्य भाषणानें. १३. अश्वविद्येचें स्थान जो नकुल त्याचे संगतीनें. १४. अश्वविद्येमध्यें. राजदूत=रावदूत=राऊत अशी 'राऊत'शब्दाची पिढी आहे. १५. कौशल्याच्या चालीवर. १६. झाला=उड्या मारणें. चौपाटा=भरधांव. टिकवणें=थांबविणें(?). मुखसंज्ञा= मुखसंज्ञेनें=तोंडाच्या खुणेनें. १७. आकाशमार्गें. १८. चालून जातों व भांडण करितों. १९. हें मीं सांगितलें हें थोडकेंच आहे. 'घोडक्या' असा प्रशस्त पाठ इतर प्रतींत आहे. २०. आश्रय मिळेल असें मनांत समजून. २१. विद्येला. २२. क्षणभर.

चा मी खिल्लारी । [1]अफाटवृषभ सहस्रवरी । एकला [2]अंगवणें आवरी, । शिक्षा करी [3]मातलिया. ॥ ११० ॥ धेनू, म्हैशी, [4]करसुवाडें । दुग्ध स्रवती [5]सरतां पाडें. । न फळती त्या फळती कोडें, । हस्तस्पर्शें माझिया. ॥ १११ ॥ वंध्या प्रसवती वासुरें ! । हा चमत्कार [6]पाहिजे चतुरें.' । राजा म्हणे, 'लक्ष खिल्लारें । तुज हातीं [7]ओपिलीं.' ॥ ११२ ॥ यावरी द्रौपदी सुंदरी । येतां देखिली [8]नगरनारीं; । म्हणती, 'मूर्तिमंत हे [9]गौरी, । [10]नवनागरी सुरकन्या.' ॥ ११३ ॥ सुदेष्णेतें सांगती वचनीं, । 'विचित्रलावण्याची खाणी, । [11]सकुमार, जातीची [12]पद्मिणी । रूप नयनीं न [13]संडे (सांठे?) ॥ ११४ ॥ ऐशी पातलीसे नारी, । कोण ते नेणवे [14]निर्धारीं; । पाचारुनी आपुल्या मंदिरीं । [15]पवित्रसंगीं ठेविजे.' ॥ ११५ ॥ धाडोनियां परिचारिक । द्रौपदी आणविली [16]जवळिक; । अवलोकितां परम सुख, । हृदयीं संतुष्ट [17]जाहली. ॥ ११६ ॥ द्रौपदी म्हणे, 'मी सैरंध्री । [18]याज्ञसेनीची शुश्रूषा करीं. । ते [19]गेलियां, तुझे घरीं । काळ कंठूं पातलें.' ॥ ११७ ॥ सुदेष्णा म्हणे, '[20]गुणैकराशी ! । माझिये स्वामिणी[21]ऐसी दिससी; । माझिये [22]वहिणीहोनी विशेषी । मजसंगती असावें. ॥ ११८ ॥ [23]काय सांगतां वाटे लाज? । दिससी [24]चक्रवर्तींची भाज. । [25]माणिककळिकेजवळी गुंज । तेंवि मी दिसें पुढारें.' ॥ ११९ ॥

---

१. न बांधलेले मोकळे बैल. 'अपेट वृषभ' असा सुंदर पाठ आम्हांस उपलब्ध झाला असता तर! अपेट=न माणसाळलेले खोंड. २. स्वतःच्या बळावर. 'अंगवळण' हा मूळ शब्द. ३. मत्त झालेल्या वृषभाला. ४. कर (हात)+सु (चांगल्या)+वाडें (मोकळीनें)=धार काढण्याचे वेळीं हाताचा आकार होतो तो? त्यानें? 'सुरवाडें' हा सुगम पाठ अन्यत्र आढळतो. ५. वांसरानें सरविल्यावर? किंवा पारठें जनावर झाल्यावर? ६. पाहावा. ७. अर्पण केलीं. ८. नगरस्त्रियांनीं. ९. पार्वती. १०. नगरांत नवीन आलेली. ११. सुकुमार (?) १२. पद्मिनी स्त्रीचें लक्षणः—'भवति कमलनेत्रा नासिका क्षुद्ररंध्रा अविरतकुचयुग्मा दीर्घकेशी कृशांगी । मृदुचरणसुशीला गीतनृत्यानुरक्ता सकलतनुसुवेशा **पद्मिनी** पद्मगंधा ॥' (रतिमंजरी). १३. मावत नाहीं? 'आसंडे' असा तर पाठ नव्हताना? १४. निश्चयानें. १५. सभ्य स्त्रियांत. १६. समीप, जवळ. हा शब्द स्वतः नाम असून येथें त्याचा क्रियाविशेषणासारखा उपयोग केला आहे. १७. 'सुदेष्णा' हा कर्ता. १८. यज्ञसेन=द्रुपद, तस्य अपत्यं स्त्री=याज्ञसेनी. १९. गेली म्हणून; किंवा गेल्यावर. २०. सर्वगुणसंपन्न अशी. २१. सारखी. २२. भगिनीहून जास्त. २३. शब्द आहेत तसा प्रश्नार्थी अर्थ होतो. 'काम' असा पाठ असता तर उत्तम झालें असतें. 'कार्य' असा पाठ उपलब्ध झाला. २४. सार्वभौम राजाची भार्या. ज्याच्या रथाला कोठेंही अडथळा येत नाहीं (शत्रु नाहीं) तो चक्रवर्ती राजा. २५. माणीक

द्रौपदी म्हणे, 'न वदें ऐसें, । तुझिये संगती वसणें असे; । [1]सत्य मानुनी मानसें । सेवा घेईं [2]मजहस्तीं. ॥ १२० ॥ उच्छिष्टअन्नाचें भोजन, । [3]पैराचें चरणक्षालन, । [4]दोनी करुनियां भिन्न । दास्य करीन मी तुझें.' ॥ १२१ ॥ सुदेष्णा म्हणे, '[5]सुमध्यमे ! । दोन्ही अयोग्य [6]तुज उपमे; । मान्य(नें?) माझ्या [7]नि समागमें । मज समान सुख भोगीं.' ॥ १२२ ॥ [8]येरी म्हणे, 'वो सुंदरी ! । आसन, वसन माझिये [9]सरी । सेवुनी असावें मममंदिरीं, । संशय न धरीं; पवित्रे !' ॥ १२३ ॥ ऐसें बोलोनी [10]प्रीतीं । द्रौपदी ठेविली स्वसंगतीं, । [11]विषमकाळाची विचित्र गती ! । चतुर पुरुषीं जाणिजे. ॥ १२४ ॥ साही जणें ऐसियापरी । गुप्त [12]ठेलीं विराटनगरीं, । [13]राहटी घडली ते पुढारीं । जगप्रसिद्ध परियेसा. ॥ १२५ ॥ मार्जारपिलींया ऐसें कांखे । [14]कुंजरवाळ कैसेंनि झांके? । अंधकारीं पळतां [15]अर्के । लोकदृष्टी न लोपे. ॥ १२६ ॥ लपवितां कस्तूरीपरिमळ । सर्व प्रगट करी [16]अनिळ, । तेंवी [17]यांचा गुप्त खेळ । भेरी[18]नाद [19]गजश्रवणीं. ॥ १२७ ॥ ऐशियापरी जन्मेजया ! । अज्ञातवास वसतां तया । पुढें वर्तलें तें राया ! । चरित्र पवित्र [20]परियेसीं. ॥ १२८ ॥ मुक्तेश्वराचीं [21]गुणसुधाळें । [22]वचनशुक्तिकामुक्ताफळें । सज्जनराजहंस[23]पाळें । [24]भाग्यागळें सेविती. ॥ १२९ ॥

---

रत्नाजवळ जशी गुंज निस्तेज होते, तशी मी तुझ्यापुढें निस्तेज दिसेन. **उपमा** आहे. माणिक रत्नासही कलिका (फुलाची लहान कळी) असें म्हटलें आहे.

१. मीं सांगितलें आहे तें खरें मानून. ११७ ओवी पहा. २. माझ्या. 'मजहस्तीं' हा समस्यंत शब्द केल्यास अर्थ होतो. पण समास धेडगुजरी होतो. ३. दुसऱ्याचे पाय धुणें. ४. या दोन गोष्टी शिवाय करून. 'भिन्न करणें' यास 'Except = take out' हा इंग्रजी शब्द कसा समानार्थक आहे ! ५. चांगला आहे मध्य (कटि) जिची. ६. तुझ्यासारखी असेल तिला. सारांश तुला. 'उत्तमे !' असा अन्य पाठ आहे. ७. खरोखर. ८. सुदेष्णा. ९. सारखें, सदृश. १०. प्रीतीनें. ११. आपत्कालाची. **अर्थांतरन्यास** आहे. Misfortunes bring to us strange bed-fellows ! १२. राहिलीं. १३. वर्तमान. मूळ अर्थ 'वागणूक, पद्धति' असा आहे. १४. हत्तीचा छावा. १५. सूर्यानें. १६. वायु. हे दृष्टांत स्मरणीय आहेत. १७. पांडवांचा. येथें पुष्कळ **अप्रस्तुतप्रशंसा** आहेत. १८. नौबतधाई. १९. हत्तीच्या कानांत. 'जगश्रवणीं' असा पाठ सुश्राव्य झाला असता. इतरत्र तसा आहेही. २०. ऐकावेंस. २१. गुणसुंदर. २२. वचनरूपी शिंपल्यांतून उत्पन्न होणारा मुक्ताफळरूपी अर्थ. येथें **रूपक** अलंकार आहे. २३. कळप. राजहंसांस मोतीं प्रिय आहे हें सुप्रसिद्धच आहे. सज्जन हेच राजहंस. २४. भाग्यश्रेष्ठत्वानें. (क्रियाविशेषण.)

## अध्याय दुसरा.

विराटनगरीं [1]साहीजणीं । गुप्त असतां, नेणिजे जनीं. । [2]राजा म्हणे, 'माझिया मनीं । संशयातें [3]पाविजे. ॥ १ ॥ दिसती जैसे [4]पंचादित्य. । म्हणती 'पांडवांचे भृत्य.' । हें तों मातें न वाटे सत्य. । राजे [5]होती [6]निर्धारें. ॥ २ ॥ पांडव अथवा हो कां आन, । अंगीं ऐश्वर्याचें चिन्ह; । या कंकाचें पाहतां ज्ञान । उणा वाटे [7]सुरगुरु. ॥ ३ ॥ बल्लवहस्तींचीं दिव्यान्नें । अमृतातें [8]म्हणती उणें. । अवलोकितां [9]अंगवणें । [10]वायुपुत्रासारिखा. ॥ ४ ॥ घेउनि कामिनीचें सोंग[11] । बृहन्नडा लोपवी [12]आंग, । परि ते पुरुषाची [13]शींग । दिसे अत्यंत वाढती. ॥५॥ नारी, नर, किंवा नपुंसक । [14]तर्कितां निर्धार नव्हे एक. । [15]क्षात्रविद्या, नरनायक । रामचंद्रासारिखी. ॥ ६ ॥ ग्रंथिक अश्वारोहणी । [16]तुळणे न दिसे आन कोणी; । तंतिपाळ म्हणे 'घ्राणीं । वेसण घालूं [17]नंदीच्या !' ॥ ७ ॥ ऐसियां हातें घेतसें सेवा, । हें अनुचित वाटे माझिया जीवा; । पुढें [18]कुशब्द नलगे नांवा । ऐसें केलें पाहिजे. ॥ ८ ॥ दृष्टी पाहातां हे सैरंध्री । [19]असी [20]शचीचिये सरी. । सुदेष्णेचें दास्य करी । हेंही अयोग्य मज वाटे. ॥ ९ ॥ जो करील इचें [21]अभिलाषण । तो पावेल तत्काळ मरण, । या लागीं कोणी अवलोकन । पापदृष्टी

---

१. सहाजण. 'जन'शब्दापासून 'जण' झाला. 'जणें' असावें पण यमकप्रीत्यर्थ 'जणीं' असा प्रयोग केला. २. विराटराजा. ३. पावत आहे. व्याकरणदृष्ट्या ही रचना असंमत होईल. 'माझें मन संशयातें पाविजे' किंवा 'माझ्या मनीं संशयानें पाहिलें,' असा कांहीं पाठ असता तर ठीक होतें. दुसऱ्या तीन प्रती अमळ उशीरानें हातीं आल्यामुळें हा पाठापपाठविवाद विशेष वाढत आहे. इलाज नाहीं. उपलब्ध झालेल्या प्रतींत असा पाठ आहे:— 'विराटनगरीं साहीजणें । गुप्त असतां नेणिजे कवणें । राजा म्हणे, 'माझिया मनें । संशयातें पाविजे. ॥'. ४. पांच सूर्यांसारखे. ५. आहेत. ६. निश्चयेंकरून, खरोखर, निःसंशय. ७. बृहस्पति. हा ज्ञानसंपन्न आहे. **प्रतीप** अलंकार आहे. ८. **प्रतीप** अलंकार. ९. शरीरसामर्थ्यानें. १०. अंगाची धारणी व इभ्रत पाहिल्यास भीमाप्रमाणें. ११. 'स्वांग' शब्दाचा अपभ्रंश. कुणबी लोक 'स्वांग' म्हणतात; तेच मूलशब्दस्वरूपाशीं द्विजांपेक्षांही जवळ आहेत! १२. स्वरूप. १३. शेरमापावर घनकोनाची आकृति होते ती. पुरुपाचा आंगलोट? १४. कल्पना करितांना एक निश्चय होत नाहीं. १५. धनुर्विद्या. 'क्षतात्किल त्रायते'=क्षत्रियः, अशी 'क्षत्रिय'शब्दाची मीमांसा कविकुलगुरुकालिदासानें केलि आहे. १६. उपमेला. १७. नंदी=शंकराचें वाहन. वृषभपति. १८. वाईट शब्द. आपली बेअब्रू होणार नाहीं, असें केलें पाहिजे. १९. असे? 'दिसे' असा पाठ आहे. २०. इंद्रपत्नीतुल्य. सरी=बरोबरीची. २१. पापदृष्टीनें इच्छा करील.

न करावें. ॥ १० ॥ मागां[1] ऐकों पांचजणी, । तयांमाजी मुख्य राणी, । ऐसें भासे माझिये मनीं । पवित्रपणें निर्धारें. ॥ ११ ॥ आतां असो हा विकल्पू[2]; । प्रगट होती आपेंआपू, । सांडून शोधायाचा संकल्पू । कौतुक[3] पाहूं काळाचें.' ॥ १२ ॥ नित्य येउनि चित्रशाळे । पाहे बृहन्नडेचे[4] कळे, । नृपरंभेहून[5] आगळें । अभ्यासवी[6] कुमरीतें. ॥ १३ ॥ लोपोनि चित्ररथाचें[7] गाणें । मुखें दावि ती[8] मधुर तानें, । तैसेंचि नारी[9] दाविती वदनें । कळा गमे सुस्वर[10]. ॥ १४ ॥ राजा म्हणे, 'बृहन्नळे! तुझें स्वरूप मातें न कळे, । अंगना म्हणों तरी आगळें। पुरुषतेज तव अंगीं.' ॥ १५ ॥ ते म्हणे, 'ऐक गा! निर्धारीं । मी नपुंसक[11] धर्माघरीं, । बैसोनियां अंतःपुरीं । सेवा करीं स्त्रियांची. ॥ १६ ॥ सर्वांगअभ्यंग-[12] मर्दनीं । हातीं नेसवीं वस्त्राभरणी,[13] । धर्मराजाचिया मनीं । विकल्प[14] कांहीं असेना.' ॥ १७ ॥ विराट म्हणे, 'सद्गुणार्थिली[15] । उत्तरा माझी दुहिता[16] भली । सुवीण[17] करुनी आपुली । नृत्य गायन शिकवावें.' ॥ १८ ॥ उत्तरा वोपितां पार्थाकरीं । कृपेनें हस्त ठेविली[18] शिरीं, । संगीतकळा तियेतें ब(व)री । शारदेसरी[19] अवगमे. ॥ १९ ॥ भीमें आणून साजूक[20] अन्नें । भोजनीं तोषवी पांचही जणें. । तैसाचि सहदेव क्षीरपानें । तृप्त करी समस्तां. ॥ २० ॥ दधि, दुग्ध, साय,

---

१. पूर्वी. हा पांडवांविषयींचा वळकट संशय राजा विराटास येत आहे. 'अहल्या द्रौपदी सीता तारा मंदोदरी तथा' या पंचकन्या प्रसिद्धच आहेत. सैरंध्रीची पवित्रता केवढी आहे पहा. २. संशय. ३. Let me see what is concealed in the womb of time. कालांतरानें काय चमत्कार होतात ते पाहूं. ४. बृहन्नडेच्या कौशल्याला. ५. दरबारच्या नायकिणींपेक्षां. 'नृत्य रंभेहूनि आगळें' हा उपलब्ध पाठ किती सुगम आणि सुंदर आहे? ६. शिकवी. अभ्यास करून घेई. ७. गायनप्रवीण गंधर्वपति त्याचें गाणें लोपवून टाकून. व्यतिरेक अलंकार. ८. बृहन्नडा मुखानें तान घेऊन दाखविते. ९. कुमारिका. १०. मधुर? ११. Eunuch. खोजा. १२. सर्वांगाला तेलें वगैरे लावणें, चोळणें, यांमध्यें. या संवाहनविधीस Shampooing म्हणतात. १३. वस्त्रालंकार. मी वस्त्रें नेसवीं. १४. किंतु. १५. सद्गुण आपल्या आंगीं असावे म्हणून वांछा करणारी. १६. हा शब्द पूर्वी ऋषिकालांत कन्येकडे काय काम असे तें सुचवितो. दुह्=दुध काढणें, धार काढणें, तें काम करणारी ती 'दुहिता. १७. शिष्यीण? चांगली वीण म्हणजे मुलगी? 'शिष्यीण' हाच पाठ इतरत्र आहे. १८. बृहन्नडेनें ठेविला. १९. सरस्वतीसारखी. चौदा विद्या व चौसष्ट कलांची सरस्वती ही अधिदेवता आहे हें प्रसिद्धच आहे. २०. 'सद्यः'शब्दापासून 'साजुक' झाला. नुकतेंच तयार केलेलें अन्न.

लोणी। आणूनि निवेदी[1] प्रतिदिनीं.। निशाकाळीं एकांतसदनीं। सेवी[2] दे[3]ती समस्तां.॥ २१॥ अश्वकळे[4] तोषोनि देखा। राजा ओपी अपार कनका;। तें ग्रंथिसि[5] बांधोनी ग्रंथिका। धर्माहस्तीं निवेदी.॥ २२॥ कृष्णा घेउनी कनकफणी। घाली सुदेष्णेची वेणी.। तोषोनि[6] अभ्यंगमर्दनीं। सुकुमार कैळीं(रीं)[7] आपुलिया.॥ २३॥ चंपक मालतीचे हार। गुंफून, करवी नित्य शृंगार[8].। सुदेष्णा अनुवादें विचार। सैरंध्रीतें एकांतीं.॥ २४॥ 'चै[9]ड(ढ)ता तारुण्याचा भरू। शरीरीं दिसे अं[10]नावरू;। काम भोगइच्छेचा विकारू। तुं[11]झ्या ठायीं न देखों.॥ २५॥ तारुण्य, चातुर्य, लावण्यता,। भाग्य, भोगीं[12] तनु वर्तती,। निष्कामभावें राहे वनिता। हें अघटित सुजाणे!॥ २६॥ वर्तत असेल जरी वासना। ते मज सांगें मनकामना.। जैसा रुचेल तुझिया मना। तैसा पुरुष लें[13]धसी.'॥ २७॥ कृष्णा म्हणे, 'वो महासती!। पवित्रस्त्रियांचे[14] संगती। वहु काळ क्रमिला म्हणोनि कुं[15]मती। स्पर्श न करी मानसा.॥ २८॥ सत्यभामा श्रीकृष्णप्रिया,। द्रौपदी पांडवांची जां[16]या,। त्यांचे संगती आपुली काया। अन्नपानें पाँ[17]ळिली.॥ २९॥ तीहीं दिधलें प्र[18]सादवस्त्र। तेणें आच्छादिलें गात्र,।

---

१. अर्पण करी. २. सेवा करी. ३. द्रौपदी. या ओढाताणीपेक्षां 'संवादती समस्तें(स्त)' हा पाठ किती उत्तम व प्रसंगानुरूप आहे? ४. अश्वविद्येला. ५. गांठीशीं. ६. 'तोपवून, आनंद देऊन' असा अर्थ घेतला पाहिजे. 'तोपवी' असाच पाठ आहे. ७. कळेनें, विद्येनें. ८. वस्त्रपात्र, दागिने यांनीं शरीरास अलंकृत करणें यास 'शृंगार करणें' म्हणतात. ९. 'चय=वृद्धिंगत होणें' यापासून 'चढ' झाला. चढता=वाढता. १०. न आवरतां येण्यासारखा. Irresistible. ११. तारुण्याचा भर वाढत असतां कामविकार स्वाधीन ठेवणें हें सुदेष्णेस असंभवनीय वाटलें, तसेंच हल्लींच्या विषयाभिनिविष्ट झालेल्या क्षीण लोकांस वाटत असतें. सुदेष्णेस व आधुनिक लोकांस काय ठाऊक कीं शुक, द्रौपदी, रामदास, शंकराचार्य इत्यादि महापुरुष मनोजय करून कामदेवास अर्धचंद्र देतात तें! १२. 'शाल्यन्नं सुघृतं' हा भर्तृहरिकृत श्लोक सर्वांनीं वाचावा. या ओळींत **सार अलंकार** असून **असंभवही अलंकार** आहे. १३. या सुदेष्णेच्या सूचनेवरून द्रौपदीवरील तिचें प्रेम व अनुकंपा व्यक्त होतातच. पण त्याबरोबरच तिचा कोता स्वभाव व निर्मर्याद आचरणशीलता हींही व्यक्त होतात. १४. संगतीमध्यें. १५. पापबुद्धि. १६. विधिपूर्वक लग्न झालेली स्त्री. 'दारान् अपत्याय' हा पूर्वकालीन लग्नाचा संकेत असे. १७. वाढविली. 'सत्संगाद्भवति हि साधुता खलानाम्' हें पद्य लक्ष्यांत आणावें. १८. कृपेचें पांघरूण.

तुझे सुखच्छाये पवित्र[1] । विश्रामलें ये काळीं. ॥ ३० ॥ करीं सैरंध्रीचें[2] कर्म । परि 'मालनी' असें माझें नाम,। तुझें देवी! पवित्र धाम । सुख, विश्राम, पावलें. ॥ ३१ ॥ स्वप्नीं नातळें[3] व्यभिचारा, । नेणें निषिद्धाचरणाचा वारा, । रहस्य[4] असें तें अंतरा[5] । गुप्त जाणोनी ठेवणें. ॥ ३२ ॥ पंच गंधर्व बळसागरू । असती देहाचे[6] प्राणेश्वरू. । मातें रक्षिती निरंतरू । निशाकाळीं जवळिके[7]. ॥ ३३ ॥ न पडती जनाचिये दृष्टी । प्रगट होती बहुसंकटीं । मजसीं करितां दुष्ट रां[8]-हाटी । शिक्षा करिती कृतांता[9].' ॥ ३४ ॥ भाव पाहोनि निर्मळ । झाली सुदेष्णा स्नेहाळ । अन्नोदकें सर्वकाळ । सांभाळित सुवस्त्रें. ॥ ३५ ॥ चत्वारि[10] मास लोटलियावरी । उत्साहकृत्य[11] विराटघरीं । मांडिलें, ते राजेश्वरीं । वार्ता कर्णीं परिसिली. ॥ ३६ ॥ असंख्य ब्राह्मणांच्या पंक्ती । नट नर्तक नाना जाती । पातले, त्यां मत्स्यनृपती । धनें, वसनें[12], तोषवी. ॥ ३७ ॥ विराटराया-प्रती विनोद[13] । आवडे कुंजरमेषयुद्ध; । जेठी भिडतां महानंद । हृदयीं उपजे आगळा[14]. ॥ ३८ ॥ मल्लयुद्धाचिये आर्ती[15] । राजा ओपी धन, संपत्ती; । ऐकोनि[16] जेठियांच्या पंक्ती । अपार तेथें पातल्या. ॥ ३९ ॥ वळें नाटोपे कवणासीं । तो[17] भिर्डवी[18] बल्लवासीं, । भीमें रगडूनी भूमीसी । चूर्ण करुनी सांडिजे. ॥ ४० ॥ कितिएक गेले प्राणें । दुजा न तुळे[19] अंगवणे[20] । हस्तहीन, पादहीने । करुनी भूमी टाकितू. ॥ ४१ ॥ भीमाचीये हातातळीं । मल्ल मारुनी मेळविले धुळी[21]; ।

---

१. 'पवित्र' हें 'सुखच्छाये'चें विशेपण. हें उच्चारितांना द्रौपदीस काय वाटलें असेल? **व्याजस्तुति** आहे. २. 'सैरंध्री परवेश्मस्था' इत्यमरः. ३. स्पर्श करीत नाहीं. ४. गुप्त. ५. मनामध्यें. ६. माझे. या देहाचे. ७. जवळ राहून. ८. चाल; वर्तन. ९. प्रत्यक्ष यमालासुद्धां. १०. चार. ११. उत्सवाचें कार्य. 'उत्सवकृत्य' हा पाठ नाहीं काय? १२. वस्त्रें; पोषाख. पोषाख देणें हें मानाचें कृत्य समजतात. १३. खेळ. रोमन लोकांमध्यें ख्रिस्ती शकाच्या पूर्वीं दुसऱ्या व पहिल्या शतकांत असल्या खेळांचा फार प्रचार होता. सामान्यतः त्या लोकांस हें अनावर व्यसनच लागलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. युद्ध करणाऱ्या जेठ्यांस ते Gladiators म्हणत. हत्ती सिंह वगैरेंची ही युद्धें होत. बडोद्याची 'साठमारी' कोणास माहित नाहीं? इतरांस दुःख देऊन आपण त्यांत मौज करून घेणें हा युद्धकालांतील जबरदस्त विकार होय. १४. विशेष. 'अग्र' या शब्दापासून याची उत्पत्ति. १५. या जबरदस्त घोकासाठीं. १६. धन मिळतें हें ऐकून. १७. इतरांस अजेय्य झालेला जेठी तो. १८. हा शब्द 'भेटवी' या शब्दाचा अपभ्रंश असेल काय? १९. बरोबरीला येईना. सामन्यास टिकेना. २०. शरीरसामर्थ्यामध्यें. २१. खालीं पाडले, नाहींसे केले.

ही वार्ता भूमंडळीं । विस्तारली जनमुखें. ॥ ४२ ॥ [1]चार सांगती हस्तनापुरीं, । 'कौतुक विराटाचे नगरीं, । मल्ल [2]झुंजती झुंझारी । त्यांतें राजा तोषवी. ॥४३॥ बल्लवरायाचा [3]रांधवणा । विराटघरीं [4]बैळसंपन्ना । त्याचिये तुळणे बळिष्ठ जाणा । [5]पृथ्वीतळीं असेना.' ॥ ४४ ॥ दुर्योधन चित्तीं [6]दुश्चित । बंधुमंत्रियां सावध करित, । 'विराटनगरीं अत्यद्भुत, । दुष्ट वार्ता [7]ऐकिजे. ॥ ४५ ॥ बल्लवनामा पाककर्ता । बळें नाटोपे कृतांता, । भीम होईल ऐसा चित्ता । संशय मातें [8]बोर्धित. ॥ ४६ ॥ [9]वर्ष एक आ(अ?)ज्ञातवासू । त्यांत लोटले अर्ध दिवसू । ठाउके न पडती पापपुरुषू । पांडव, वैरी आमुचे. ॥ ४७ ॥ बळिष्ठ [10]जेठी जीमूतीनामा । [11]यत्नें धाडिजे विराटग्रामा, । तेणें वोळखिल्या भीमा । [12]काज झालें आमचें. ॥ ४८ ॥ [13]नागायुतबळें वरिष्ठ । रगडूं शके भीमाचा कंठ । भिडतां [14]भंगे तरि विराट । धन [15]ओपील अपार. ॥ ४९ ॥ करुनी पांडवांच्या प्रतिमा । पायीं बांधोनी, ठेविजे [16]नांमा; । ज्या कां देखोनी दृष्टीसि, भीमा । क्रोध अद्भुत नावरे. ॥ ५० ॥ भिडतां जाणवेल [17]यांतें । वार्ता पावेल आमुतें, । पुढती तेरा वर्षें त्यांतें । अरण्यवासा [18]बोळवूं.' ॥ ५१ ॥ ऐसें बोलोनी त्या अवसरा । जीमूती धाडिला विराटनगरा. । भेटोनियां राजेश्वरा । वल्गना [19]करी

१. दूत. २. 'युद्ध'शब्दापासून उत्पन्न झाला. झुंझार=युद्ध करणारा, लढणारा. ३. स्वयंपाकी. 'रंध्=स्वयंपाक करणें' या शब्दापासून झाला. ४. यमकासाठीं 'संपन्न' याचें 'संपन्ना' झालें आहे. ५. On the surface of the Earth. पृथ्वीच्या पाठीवर. ६. दुर्धर काळजी लागलेला, खिन्न. ७. ऐकावी. 'आकर्ण'पासून 'ऐकणें' झाला. 'ऐकिजे' हें कर्मकर्तरि विध्यर्थी रूप. येथें आज्ञार्थही होईल. 'इष्ट वार्ता' असा एका प्रतींत पाठ आहे तो दुर्योधनाच्या दुष्ट बुद्धीला अनुरूपच आहे असें दिसेल. ८. संशय बोधित=संशय सांगतो, संशय येतो हा अर्थ होईल. पण 'बाधत=त्रास देतो' असा पाठ असता तर दुर्योधनाच्या दुश्चितत्वाची फोड झाली असती. 'बाधित' असाच पाठ इतर प्रतींत आढळतो. ९. मुळांत चार महिने झाले असेंच आहे. दुर्योधन मात्र सहा महिने झाले असें म्हणत आहे. जीमूतमल्लास दुर्योधनानें पाठविलें असा उल्लेख भारतांत नाहीं. तस्मात् ही कविप्रतिभा होय. प्रसंगही भीमास आवेश आणणारा आहे. १०. पैलवान. ११. 'युक्तीं=युक्तीनें' हा पाठ उत्तम झाला असता. १२. 'आपलें काम झालेंच मग' असा अजूनही म्हणण्याचा प्रघात आहे. १३. हजार हत्तींच्या बळानें श्रेष्ठ. १४. भीम पराभव पावला तर. १५. बक्षीस देईल. १६. नांवें घालावीं. यावरून पूर्वी प्रतिमा हुबेहुब करीत असत असें दिसतें. १७. जीमूताला. १८. माघारे आणूं. ही दुर्योधनाची युक्ति कोणा कपटपटूस मानवणार नाहीं? 'बोळवूं' हाही उत्तम पाठ आहे. १९. 'जीमूत' हा अध्याहृत कर्ता. त्या अवसरा=लागलीच.

कुशब्दें. ॥ ९२ ॥ म्हणे, 'येथें बल्लवनामा । कोण तो दाखविजे आम्हां, । पायीं असे त्याची प्रतिमा । तो वोळखेल[1] आपुलिया.' ॥ ९३ ॥ कंक म्हणे, 'रे मूढमती! । करणी करुनी दाविजे हातीं । मागें[2] न्यून बोलतां, संतीं । शून्यक[3]-प्राय मानिजे.' ॥ ९४ ॥ 'पराचें[4] दुःखें दुखवलें मन । म्हणोनी कंका! बोलसी वचन, । बल्लव पावलिया मरण । रूदन करिसी वाटतसे.' ॥ ९५ ॥ 'कवणा मरण? कवणा जय? । प्राप्त होतां[5] हाची समय'. । धर्म बोलतां धनंजय । खुणे वारी तयातें. ॥ ९६ ॥ 'होईल तेंची पाहिजे दृष्टीं । व्यर्थ कासया बोलसी गोष्टी? । कौतुक पाहे, ठेलें[6] निकटी । लोकदाटी अत्यंत.' ॥ ९७ ॥ मत्स्यरायें संतुष्टचित्तें । पाचारिलें[7] बल्लवातें, । पाँच पूतळे दावीतां त्यातें । क्रोधें कांपे थरथरा. ॥ ९८ ॥ म्हणे, 'मी ब्राह्मण बल्लवनामा । तुमचे संगती सूपकर्मा[8], । नेणे जेठियाच्या वर्मा[9] । कळा, कंठीं लावणें. ॥ ९९ ॥ तथापी तुमचें भक्षिलें अन्न । यालागीं अंगीकारावें वचन, । आंग्रह[10] करितां, महाजन । मूर्ख ऐसें मानिती. ॥ ६० ॥ होतों पांडवांचे सदनीं । त्यांचे पूतळे याचे चरणीं । देखोनी खेदें[11] उपजे मनीं । प्रायश्चित्त द्यावया. ॥ ६१ ॥ हेडंब, बकासुर, क्रि[12]-मिर । भीमें मारिला जटासुर । त्याचे पंक्ती हा पामर । बैसवीन मी आजी. ॥ ६२ ॥ इतुकेन[13] पांडवांचें ऋण । कांहीं तरी होईन उत्तीर्ण[14], । उरल्या(लें?)[15] तुमचे कृपेकरून । तुमचे संगें परिहारूं.' ॥ ६३ ॥ ऐसे बोलोनी महाबळी ।

---

१. आपण आतां 'ओळखील' असें म्हणूं. 'उपलक्षण'पासून निघाला. २. दुसऱ्याच्या परोक्ष. ३. 'शुनकप्राय' (कुत्र्याप्रमाणें) हा पाठ आहे तो बहार आहे. कंकाची ही उक्ति नीतीस अनुसरून नाहीं असें कोण म्हणेल? शून्यकप्राय=निरर्थक. ४. 'परदुःखेन दुःखिता विरलाः' हें ध्यानांत ठेऊन जीमूत कंकास टोंचून बोलत आहे. पांडवांचा संशयही त्यास आला आहे. ५. (या वेळेस) प्राप्त होणार आहेत, त्याचा निकाल 'घोडें मैदान जवळच आहे' या न्यायानें लवकरच होईल हें धर्माच्या बोलण्याचें तात्पर्य आहे. धर्मापेक्षां बृहन्नटेची शांति विशेष प्रशंसनीय आहे. ६. येऊन उभें राहिलेलें. ७. पुतळे पाहिल्याबरोबर भीमास क्रोध आला, यावरून पूर्वीं हुबेहुब पुतळे अगर प्रतिमा करीत असत असें मानणें भाग येतें. भीमानें नांवेंही वाचलेलीं दिसत नाहींत. ८. स्वयंपाकी. ९. पाचपेंच मला ठाऊक नाहींत. १०. मी लढत नाहीं हा हट्टच घेतला तर. ११. आहे असा पाठ घेतल्यास 'खेद' याचा अर्थ 'दुःख' इतकाच न घेतां 'दुःखनिवारणार्थ उत्पन्न होणारा चित्तक्षोभ (संताप)'ही यांत घेतला पाहिजे. 'संताप' हा एका प्रतींत पाठही आहे. १२. 'किर्मीर' हा शुद्ध पाठ. १३. इतुक्यानें, येवढें केलें तर. ही तृतीया थेट संस्कृताप्रमाणें झाली आहे. १४. थोडामा ऋणमुक्त होईन. १५. राहिलेलें ऋण.

मृत्तिका मर्दुनी पाणीयुगळीं, । जीमूती धांवे वक्षःस्थळीं । [1]वज्रमुष्टी मारावया. ॥ ६४ ॥ त्याचा [2]टाळुनियां हात । हृदयावरी मारिली [3]लात, । पडे, जैसा महापर्वत । शक्रवज्रें ताडितां. ॥ ६५ ॥ ता(तो)डोनि पायीचें [4]माळे । शिरीं खोंविली वंदोनी [5]भाळें. । म्हणे, 'आजी पांचही पुतळे । [6]याचेनि रक्तें अभिषेकूं! ॥ ६६ ॥ मुष्टी मारितां परस्परें । दणाणती दिगंतरें, । प्रचंड[7]लत्तांचीये प्रहारें । दोघे हांवे न टळती. ॥ ६७ ॥ मल्लविद्येच्या [8]कडोविकडी । जीमूती दाविता [9]पडेंपाडीं । भीम आंगाचिया प्रौढीं । त्याहुनी ताडी [10]आंगळें. ॥ ६८ ॥ उचलूं जंव पाहे भीमातें । तंव तो नुचले तयातें. । झुगारुनी [11]अंबरातें । भीम [12]टाकी भूतळीं. ॥ ६९ ॥ [13]सत्तरवेळा टाकिला भूमी । देव कौतुक पाहति व्योमीं, । 'बाप रे भीमा!' म्हणोनि कुसुमीं । वर्षाव करिती [14]विनोदें. ॥ ७० ॥ तीक्ष्ण मारिती कोंपर । जानू, गुढगे अतिकठोर, । दृष्टीं देखोनियां युधिष्ठिर । चोज मानी मानसें. ॥ ७१ ॥ म्हणे, 'भक्षिलें तुमचें अन्न । यालागीं [15]तडावला [16]अंगवण । आणीक होता तरी मरण । तत्काळिक पावता. ॥ ७२ ॥ रागें पीळिती [17]कंठनाळें । पादतळें, कटिमंडळें, । कुशी ताडितां अस्थिजाळें । कडकडाटें

---

१. वज्रासारखी मूठ वळून ती उरावर मारण्यास. या खेळास इंग्रजींत Boxing हें नांव आहे. २. चुकावून. ३. 'लत्ते'ची 'लात'. हलीं 'लाथ' झाली आहे! ४. पुतळे बांधिलेली माळा. ५. कपाळानें, शिरीं वंदून. ६. याच्याच. ७. लाथांच्या. कर्णसुखासाठीं 'लत्तांचिये' अशी योजना आहे. शिवाय तृतीयेचा 'ए' हा प्रत्यय सामान्यरूप सिद्ध करण्यास उपयोगीं पडतो. ८. 'अकटोविकट' याचा हा अपभ्रंश असेल काय? कडोविकडी=भयोत्पादक पेच. ९. 'पडिपाड' म्हणजे कुस्ती, झोंबी, मारामारी असा शब्द आहे. 'पडेपाडी' असा शब्द नाहींसें वाटतें. 'पडे पाडी' असे निराळे शब्द घेतल्यास चांगलेंच, तथापि मूळांतील स्वारस्य नाहींसें होतें. कुस्तीचे पाचपेंच जीमूतानें दाखविले ते प्राण घेणारेच होते. पण भीमानें आपल्या शारीरिक बळानेंच जीमूताचे पाचपेंच व्यर्थत्वास नेले. १०. जास्ती. ११. गगनापर्यंत. १२. जीमूतास टाकलें. १३. 'सप्त' 'सतरा' असे अन्य पाठ आहेत. हा पाठ देण्याचा मतलब इतकाच कीं पाठांतरांत 'सप्त'चे 'सत्तर' कसे झाले हें तावडतोब लक्ष्यांत यावें. पराचा कावळा होतो तो असा. हें श्रवणमनोहर मल्लयुद्धकथानक भारतामधून वाचण्याची आम्ही संस्कृतज्ञ वाचकांस मोठ्या आदरानें शिफारस करितों. १४. विशेष आनंदानें, सुखानें, हर्षानें. पंतांनीं केकावलींत 'सदाशिवमनोविनोदास्पदा' असें श्रीविष्णूच्या संबंधानें म्हटलें आहे. १५. जय पावला. 'तड' 'तट=किनारा' या शब्दापासून होऊन 'किनाऱ्यास पोहोंचणें, जय मिळविणें' असा अर्थ झाला आहे. १६. शारीरिक सामर्थ्यानें. १७. गळे.

मोडिती. ॥ ७३ ॥ सन्मुख मारिती [1]हुमणीया । दुर्जनदंतें[2] जाले कणीया; । पर्वतमस्तकींच्या पाणीया- । सारिखें अशुद्ध खळबळी. ॥ ७४ ॥ 'कांडणें, कुटणें, [3]पैरिघाटणें, । पाटा पसरोनि वरि लाटणें, । [4]पाकक्रियेचीं लक्षणें । तुज दावूं जेठीया!' ॥ ७५ ॥ हस्तघातीं पादघातीं । अनुकार[5] दावी पाहूनि क्षिती, । 'ऐसें उचलिजे' म्हणवोनि हातीं । देह टाकी पालथें. ॥ ७६ ॥ नचले जेठीयाचें बळ । म्हणे, 'हा होय कुंतीबाळ, । [6]गात्रें झालीं सर्व विकळ । कोण सांगे कौरवां?' ॥ ७७ ॥ मग उचलोनि [7]वाहिला शिरीं । सहस्र फेरे चक्राकारीं । देवोनि, टाकिला धरित्रीवरी । पक्व फळासारिखा! ॥ ७८ ॥ 'जैसें फोडिजे नारिकेळ' । म्हणोनि पायीं ताडिलें [8]मौळ । मूर्छा [9]दाटोनि प्रबळ । पंचप्राणा [10]मूकला. ॥ ७९ ॥ पुतळे बांधिले [11]जैये पायीं । तो चरण छेदिला हस्तघायीं, । [12]वृक्षशाखा टाकिजे भुयीं । तैसा [13]खंडोनि टाकिला. ॥ ८० ॥ जीमूती मारिला विराटनगरीं, । मल्ल पळाले दिगंतरीं, । वार्ता पावली हस्तनापुरीं । कौरवसभे जनमुखें. ॥ ८१ ॥ जाणविती कौरवां समस्तां 'देखा । बल्लव भीमाचे सारिखा, । जीमूती धाडिला परलोका । [14]ठाव तुम्हांतें पाहावया.' ॥ ८२ ॥ कौरव म्हणती, 'कैसें काय? । बल्लव भीम होय कीं न होय?' । शकुनी म्हणे, '[15]निजनिश्चय । पांडव जाण ते ठायीं. ॥ ८३ ॥ पुढें [16]कळों जाईल सहजें, । आतां उतावेळ न होइजे, । [17]पांडवबळाचेनि काजें । ऐसींच पुढें घडतील. ॥ ८४ ॥ दुर्योधन, दुःशासन, । शाल्व, रुक्मिया, कीचक जाण, । मगधराजा, [18]जीमूतवाहन, । बळ संमान सातांचें. ॥ ८५ ॥ भीमसेन करूनि भिन्नें[19] । जीमूतवाहना मा-

---

१. ढुशा. २. दांतांच्या कण्या झाल्या. खालची **उपमा** किती सरस आहे! ३. सभोंवार फिरविणें. ४. ही भीमोक्ति आहे. पाकनिष्पत्तीकडे हल्लीं योजना असल्यामुळें स्वारी सूपशास्त्रांतीलच क्रियेसच प्रारंभ करणार आहे. ५. पृथ्वी प्रतिध्वनी करावयास लागली. ६. इंद्रियें व अवयव हीं थकलीं. ७. डोक्यावर घेतला. ८. मस्तक. ९. येऊन. 'मूर्च्छा दाटणें' हा प्रयोग ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. दाटून=दाट होऊन. १०. मू(मु?)कला= मुक्त झाला, मेला. ११. ज्या. १२. झाडाची फांदी. येथें **उपमा** आहे. १३. खंडें (भाग) करून. १४. स्थान, राहण्यास जागा. तुम्हांस राहायाला जागा पाहण्यासाठीं जीमूतीस पुढें पाठविला–हें सांगण्याचा भाव. १५. स्वतःचा सिद्धांत. १६. कळून येईल, कळण्यांत येईल. हा कर्मकर्तरिप्रयोग आहे. १७. पांडवांच्या बळाच्या योगानें, अशींच कार्जे (चमत्कार) पुढें होतील. १८. प्रस्तुत कथेचा उपनायक जीमूती. या सातांपैकीं पांचांस भीमानेंच मारिलें. १९. एकीकडे काढून.

रील कोण ? । आतां धरूनियां मौन । [1]बुद्धीं कार्य साधावें.' ॥ ८६ ॥ विदुर म्हणे, 'हे कल्पना । व्यर्थ, [2]वावु(उ)गी विवंचना, । ईश्वरभांडारींच्या [3]रत्ना । गणित कोण्हा न करवे. ॥ ८७ ॥ अनंत ईश्वराचे वेष, । धरातळीं सिद्ध पुरुष । [4]सा-म्योन दिसती, परि प्रकाश । लोकत्रयीं न [5]समाये. ॥ ८८ ॥ बलवंत, प्रताप-वंत, । यशवंत, कीर्तिवंत, । ईश्वराचे अवतार मूर्तिमंत । स्थळोस्थळीं वसताती. ॥ ८९ ॥ पायीं बांधोनि [6]पांडवांतें । [7]श्लाघ्यता मिरवूं गेला तेथें । [8]अहंकार न साहे ईश्वरातें । तेणें शिक्षा लाविली. ॥ ९० ॥ स्तंभ [9]देखोनि अंधकारीं । तस्कर म्हणूनि बोभाट करी ! । व्यसन घडे, तें पांडवां शिरीं । निमित्त तुम्ही ठेवितसां. ॥ ९१ ॥ भीमा ऐसे वळसमर्थू । ईश्वरसृष्टींत असंख्यातू, । देव प्रेरूनि [10]अंगाधकृत्यू । स्वल्पाहातीं घेतसे. ॥ ९२ ॥ प्रेरूनियां [11]अरण्यचरें । रावण [12]त्रासिला जगदीश्वरें, । एका ब्राह्मणाचेनी [13]कुमरें । [14]कार्तवीर्य दंडिला. ॥ ९३ ॥ [15]एकला एक [16]प्लवंगम । तेणें लंका केली भस्म । ऐसा ईश्वरमहिमा [17]परम । कोण्हा न कळे वीर हो ! ॥ ९४ ॥ घेऊनी बल्लवाचें नाम । जीमूती मारिला हो ! अधम । पांडवांचे अंगीं हा [18]कर्दम । कल्पनेचा न लावणें.'॥९५॥ यापरी कौरवांचीं चित्तें । [19]पशुसीं वळोनि विचारहस्तें । विदुर [20]विज्ञानपंडितें ।

१. बुद्धीनें, शहाणपणानें. २. 'वावगी' असें असावें. व्यर्थ. 'वाव(वायु)'पासून हा शब्द झाला. ३. 'बहुरत्ना वसुंधरा' या न्यायानें. ४. साम्य+उन=साम्येंकरून उणे. 'सामान्य' या पाठानें सुबोध अर्थ होतो. ५. मावत नाहीं. ६. पांडवांच्या प्रतिमांस. लक्षणेनें 'पांडवांतें' असें म्हटलें. ७. मोठेपणा, ऐट. ८. गर्व. ग्रीक व रोमन लोकांत अशीच कल्पना होती. मनुष्याची अति भरभराटी झाली म्हणजे गर्व व्हावयाचा आणि गर्वाचें घर खालीं जावयाचें अशी त्यांची समजूत होती. हा ईश्वरी प्रकोप टाळण्यासाठीं ते लोक मुद्दाम आपल्यास दुखापत करून घेत! ९. खांबाला पाहून चोर म्हणून ओरडणें हें जसें मूर्खत्वलक्षण, तसेंच भलत्यांला पांडव म्हणणें हें होय. १०. मोठमोठालीं कृत्यें. 'तृणेन कार्यं भवतीश्वराणाम्' ही कविवर्योक्ति प्रसिद्धच आहे. ११. रानांत फिरणारीं माकडें. १२. त्रासविला. प्रयोजकभेद. १३. परशुरामानें. नि=खरोखरच. १४. सहस्रार्जुन. हा सर्व देवांस भारी झाला होता. १५. 'एकुलता एक' असें आपण म्हणतों. 'एकटा' हें अभियुक्त रूप आहे. १६. उड्या मारित चालणारा वानर. मारुति. १७. अगाध. समजण्याच्या पलीकडचा. १८. मळ. भीमानें बल्लव नांव घेऊन जीमूत मारिला हें अपकृत्य. १९. पशूंप्रमाणें. येथील **उपमा** हृदयंगम आहे. विचार हाच कोणी हात. येथें **रूपक** आहे! वळून=वठणीस आणून; माणसाळवून. २०. व्यवहारचतुर पंडितानें.

स्वस्थ [1]गोठणीं बैसविलीं. ॥ ९६ ॥ विराट तोषोनी अंतरीं । क्षणक्षणीं आश्चर्य करी । म्हणे, 'पुरूष[2] पृथ्वीवरी । कोण कैसे नेणवे?' ॥ ९७ ॥ अवलोकोनी भीमसेन । राजा वाढवी[3] बहुत मान, । म्हणे, 'आमुतें सांभाळून । स्वस्थचित्तें असावें.' ॥ ९८ ॥ पुढें कीचकाचें हनन । स्वहस्तें करील भीमसेन । तें अद्भुत निरोपण[4] । अमृतप्राय, परिसावें. ॥ ९९ ॥ मुक्तेश्वरकवीची वाणी । नवरससें सुगरणी[5] । तृप्त करी सुखभाजनीं[6] । श्रवणद्वारें संतांतें. ॥ १०० ॥ इति[7] श्रीविराटपर्व भारत । कथारूप परमामृत । भूतळीं पातलें, संत । अत्यादरें परिसोत. ॥ १०१ ॥

---

## अध्याय तिसरा.

सुदेष्णेचे संनिधानीं । दुःख तें सुख मानूनि मनीं । वर्तत असतां याज्ञसेनी । विपरीत कांहीं मांडिलें[8]. ॥ १ ॥ विराटाचा सेनापती । कीचकनामा पापमूर्ती । सुदेष्णेचा बंधू कुमती । भगिनीगृहा[9] पातला. ॥ २ ॥ कृष्णा अवलोकितां नयनीं । हृदय भेदिलें [10]पंचबाणीं, । म्हणे, 'ऐसी लावण्यखाणी । तुज कोठून लाधली?' ॥ ३ ॥ अयोग्यस्थळीं कल्पलतिका[11] । [12]वृंदारीनिकट कर्दळिका । देखोनी म्हैसा मारी थडका । माजोनियां ज्यापरी. ॥ ४ ॥ अमृतवल्ली फळली फळीं । वनांत वाढली निराळी । पांथीक क्षुधेचिया काळीं । काष्टिका[13] ताडिती निर्धारें. ॥ ५ ॥ तेंवी सुंदर सगुण(सुगुणी?) वनिता । आप्तावेगळी परगृहीं वसतां । कामि(मु?)कमेळ भोंवे[14] भोंवता । हें आश्चर्य तंव नव्हे. ॥६॥

---

१. गोस्थान (गोशाळा, गोठा) त्यामध्यें. २. मनुष्यरत्नें. ३. मान वाढविणें=योग्यतेस चढविणें. ४. कथानक. ५. 'सुगृहिणी'पासून 'सुगरण' 'सुग्रण' हे शब्द निघाले. चतुर, कार्यक्षम. ६. सुख हेंच भाजन (पात्र). **रूपक** आहे. ७. याप्रमाणें व्याख्यान संपलें म्हणजे 'इति'शब्दाचा उपयोग करितात. 'अथ' याचा प्रारंभीं उपयोग होतो. ८. कांहीं विपरीत (अशुभ, अमंगळ) उत्पन्न होण्यास प्रारंभ झाला. 'मांडिलें' याचा 'दुर्दैवानें' कर्ता घ्यावा, किंवा कर्मकर्तरिप्रयोग समजावा. 'वर्तलें' हा चांगला पाठ उपलब्ध आहे. ९. अज्ञातवासाचे दहा महिने झाल्यावर हा प्रसंग ओढवला. १०. मदन, पंचशर. 'कंदर्पो दर्पकोऽनंगः कामः पंचशरः स्मृतः' इत्यमरः. (अरविंद, अशोक, आम्र, मोगरा, नीलकमल हे पांच बाण मदनाचे आहेत.) ११. कल्पवल्ली. १२. वृंदावनीं. 'बदरीनिकट' हा पाठ सरस आहे. येथील **दृष्टांत** किती समर्पक आहेत? १३. काठीनें. १४. हिंडे.

भगिनीलागीं बोले वचनीं, । 'ये[1] प्रमदेच्या अवलोकनीं । विरहताप उदेला[2] मनीं । तो जाळील देहातें. ॥ ७ ॥ ईचें झालें अवलोकन । तेणें नेत्रद्वारा मंदिरापान[3] । चढलें, म्हणोनि आठवण । शरीराची विसरलों. ॥ ८ ॥ स्मरें विस्मरणाचे जी-[4] वनीं । लज्जा[5], मर्यादा, बुडविल्या दोनी । मृत्युभयाचें वस्त्र झणी[6], । फिटोनी पडलें केंवि तें? ॥ ९ ॥ अद्भुत माजला वीर(विरह?)ज्वर । तोची भासे भूत-संचार । हृदयकाळिजीं खडतर । कंदर्पसर्प झोंबला. ॥ १० ॥ ईच्या अधरामृतपानें । पीनपयोधरआलिंगनें । शरीरभोगाच्या भोजनें । भाउवीज[7] मज करीं.' ॥ ११ ॥ येरी[8] म्हणे, 'हे सैरंध्री! । सांप्रत असे माझिये घरीं, । भ्रतारवंती सदाचारी । पतिव्रता देखिजे. ॥ १२ ॥ नेमा न चळे माझिया वचनें, । तुवां बोधिजे धनदानें, । अंगिकारिलें[9] तरी समाधानें । इच्छा पुरवीं आपुली.' ॥ १३ ॥ राजांगनेच्या निगूंढागारीं[10] । पांचाळीतें प्रबोध[11] करी, । म्हणे, 'सुंदरे! परमंदिरीं[12] । कां भोगिसी अवदसा[13]? ॥ १४ ॥ पाहातां तुझें अंग-चिन्ह । चक्रवर्तींचें[14] अंगनारत्न, । तुझीया सौंदर्यासमान । शक्रमणी[15] कुरूपा. ॥ १५ ॥ उर्वशी, सुलोचना, रती, । दमयंती, माधवी[16], तपती[17](?), । यांचें सौंदर्य चातुर्य त्रीजगती । वाखाणिती जाणें[18] तें. ॥ १६ ॥ अंगना माझीया वरिष्ठ । ऐसें बोलती श्रेष्ठ श्रेष्ठ, । परी त्या दीपका[19] होती कष्ट । सूर्यप्रभे[20] सन्मुखा. ॥ १७ ॥

---

१. या काम उत्पन्न करणाऱ्या स्त्रीचें अवलोकन झाल्याबरोबर. २. उदय पावला. नामांस क्रियापदें करण्याची आमच्या कवींस भारी हौस! ३. येथें **अतिशयोक्ति** व **असंगति** अलंकार आहेत. ४. पाण्यामध्यें. कीचक मर्यादा विसरला आणि कवीस त्या विस्मरणाची मीमांसा करावी लागली! काय कामपिशाचाचा भयंकर झपाटा हा! ५. 'कामातुराणां न भयं न लज्जा' हा अनुभवच आहे. ६. पटकन्. ७. शाबास! कीचका! आपल्या भगिनीजवळ भाऊवीजेची खाशी मेजवानी मागितलीस! सुदेष्णेस आपल्या भावाच्या भापणाबद्दल केवढा अभिमान वाटला असेल? ८. ही सुदेष्णा. ९. अनुमोदन मिळालें तर. कांचनाचा प्रभाव कांतिपेक्षांही मोठा आहे असें सुदेष्णेचेंही मत होतें आँ! १०. गुप्तगृहामध्यें. ११. उपदेश. १२. दुसऱ्याचे घरीं राहून असे हाल कां भोगतेस? **सार** अलंकार आहे. पर=उत्कृष्ट असाही अर्थ होईल. १३. 'अवदशा' याची 'अवदसा' झाली! १४. सार्वभौम राजाची पट्टराणी व्हावयास योग्य असें हें (तूं) स्त्रीरत्न आहेस. १५. शची. येथें **व्यतिरेक** अलंकार आहे. १६. रुक्मिणी. १७. तपती ही सूर्यकन्या संवरणनामक राजास दिली होती. १८. 'जाणते' हा कांहीं प्रतींतील पाठ चांगला आहे. १९. येथें **रूपक** असून **दृष्टांता**चाही भास होतो. 'कष्ट'बद्दल दोन प्रतींत 'भ्रष्ट' व एकांत 'पष्ट' (स्पष्ट) असे पाठ आहेत. 'पष्ट' हा पाठ चांगला. पष्ट=निश्चयानें. २०. **अतिशयोक्तिमूलक दृष्टांत** आहे.

तेंवी भूपाळांचीया भाजा । तूतें देखोनी पावती लज्जा, । दैवें [1]संग झालीया माझा । मग उपमाची असेना. ॥ १८ ॥ आतां विचारूनि स्वार्थ । मातें करीं प्राणनाथ, । हेममंदिरीं भोग[2]भरित । रत्नमंचकीं पहुडे कां. ॥ १९ ॥ [3]मही-मौल्य दिव्य रत्नें । [4]लेववीन बहुभूषणें । [5]मुक्तपल्लवीं तगटी वसनें । परिधान करीं [6]डोळसे! ॥ २० ॥ तपाचित [7]पीसीतान्नें । तांबूल, आसन, चंदन, सुमनें । चित्रविचित्र [8]सुरतासनें । अंगसंगीं(गें?) सुख भोगीं. ॥ २१ ॥ तुज ऐसी [9]ऐश्वर्यनिधी । लागली [10]दरिद्रक्षयव्याधी । आतां मत्संगीं दिव्य औषधी । सेवूनि होईं [11]निर्जरा. ॥ २२ ॥ आतां प्रसन्न करुनियां मन । [12]आवडी देईं आलिंगन, । कीचकजाया हें अभिधान । आजिपासुनी मिरवीं कां. ॥ २३ ॥ माझिया घरींच्या कुळनायका । त्या करीन तुझ्या [13]परिचारिका । मी ही आज्ञेच्या सेवकां- । माजी ऐसें [14]मानावें.' ॥ २४ ॥ पाय स्पर्शोनीया हस्तें । म्हणे, '[15]करुणा करीं मातें, । श्रेय घेईं, मरतयातें । वांचविल्या [16]जय असे.' ॥ २५ ॥ ऐकोनी पापिष्ठाची वाणी । द्रौपदी बोटें घाली कानीं, । म्हणे, '[17]त्राहें त्राहें चक्रपाणी! । [18]संकष्ट हरीं समर्था!' ॥ २६ ॥ मग म्हणे, 'रे मंदमती! । पांच गंधर्व माझे पती, । तुझी [19]रक्षा करुनी हातीं । गंगोदकीं टाकितील. ॥ २७ ॥

---

१. माझ्याशीं रत झालीस तर सुवर्णाचा सुगंधाशीं योग होऊन तुझी योग्यता निरुपम होईल. तुला योग्य पति नाहीं म्हणून तुला भूपालभार्या लाजतात इतकेंच. तुझा माझा योग झाला तर आपल्याला भुवनत्रयांत जोडाच राहणार नाहीं. २. नानाप्रकारच्या उपभोग्य वस्तूंनीं भरलेला. 'भोग करित' असा पाठ आहे. ३. पृथ्वीच्या मोलाचीं. ४. अंगावर घालीन. ५. मोत्यांची झालर आहे, पदरास मोतीं आहेत, अशीं तगट (तकट=भरगच्ची) वस्त्रें. ६. मृगनयने! डोळे काय ते तुलाच, बाकीच्या स्त्रिया नयनहीन होत. ७. दळून, मळून उत्तम तऱ्हेनें तयार केलेलीं अन्नें. 'पिशितान्नें' असा पाठ घेतल्यास 'मांसान्नें' असा अर्थ करावा. ८. हीं चौऱ्यांशी आहेत म्हणतात! ९. सौंदर्यखाणी, शृंगारसुंदरी, तिला. १०. दारिद्र्यरूपी क्षयरोग. ११. वृद्धावस्था येणार नाहीं अशी. **रूपक** मनोहर आहे. १२. आवडीनें. १३. दासी. १४. येथपर्यंत कीचकानें द्रौपदीची स्तुति करून तिला भोग्य वस्तूंनीं लालुच दाखविण्याचा प्रयत्न केला. उपभोगाच्या वस्तूंतच प्रेम आहे काय? १५. येथें द्रौपदीच्या करुणाविकाराला जागृत करण्याची कीचकाची खटपट आहे. मातें=मला. कामातुर झालेला कीचक द्रौपदीस 'आई' म्हणायला कमी करायचा नाहीं! १६. महत्पुण्य आहे. १७. रक्षण कर, परमेश्वरा! रक्षण कर. १८. संकट. यांत पकार केव्हां शिरला हरी जाणे? १९. वांचण्याची इच्छा करणाऱ्या कीचकनीचाला कशी भेवडावीत आहे पहा!

[1]पश्चिमेस पावे शशिमंडळा । बाळक इच्छी गगनफळा । तेंवी पवित्रांची अं[2]बळा । केंवि लाधेल तव करीं ? ॥ २८ ॥ चालवीं सैरंध्रीचें कर्म । परि तपें[3] शरीर जालें चर्म । ऐसियेचा अभिलाषधर्म[4] । तूं एक धरिसी भोगावया. ॥२९॥ मणी देखोनी झगमगितू । [5]वाळवीवरी घालितां हातू । वस्तू न मिळे परि मृत्यू । तत्काळिक पाविजे. ॥ ३० ॥ तेंवी मी सिद्धपुरुषाची[6] वस्तू । स्पर्श करितां पावसी मृत्यू । जेंवी दीप कवळितां घातू । पतंगातें तात्काळीं.' ॥ ३१ ॥ ऐकोनी पांचाळीचें वचन । कीचक झाला हुताशन[7], । म्हणे[9], 'मातें वारील कोण ? । बळात्कारें भोगितां. ॥ ३२ ॥ पांच [8]गंधर्व सांगसी गोष्टी । ते दाखवीं माझे दृष्टी । त्यांचेनि रक्तें पृथ्वीतटीं । [10]संमार्जन मी कर्ता. ॥ ३३ ॥ देव, गंधर्व अथवा दैत्य । तुजलागीं पातल्या बळसमर्थ । तितुकीयांचा करीन घात । अर्ध क्षण न लगतां. ॥ ३४ ॥ माझीयेनि पाडें [11]आतुर्बळी । दुजा नाहीं भूमंडळीं, । शक्र पातल्या सर्व [12]दळीं । [13]विभांडीन प्रतापें. ॥ ३५ ॥ विराट माझा [14]स्थापितू । मीच येथील नृपनाथू; । वारावया मज समर्थू । दुजा नाहीं ब्रह्मांडीं. ॥ ३६ ॥ आतां [15]जोणें, निज निर्धारीं । तुज भोगीन बळात्कारीं, । रक्षण करूनी आपुल्या घरीं । भार्या करीन [16]पटाची.' ॥ ३७ ॥ द्रौपदी म्हणे, 'ऐक वचन, ।

---

१. येथें प्रतिवस्तूपमामूलक **उपमा** आहेत. आहे हा पाठ चुकला आहे. दुसऱ्या प्रतींत 'प्लवंग' 'पतंग' 'पंगुर' 'झेपावे' असे पाठ आहेत ते चांगले आहेत. **असंभावना** अलंकार. गगनफळ=सूर्य. २. 'बाळा' हा पाठ उत्तम होय. ३. मी दासीचें काम करितें. पण वाचिक व मानसिक तपश्चर्येनें माझें शरीर अस्थिचर्ममात्र उरलें आहे. या माझ्या तपःसामर्थ्याचा प्रभाव येवढा आहे कीं आज दहा महिन्यांत माझ्याकडे वांकड्या दृष्टीनें कोणीही पाहिलें नाहीं. तूंच एक दिवटा मात्र निघालास ! 'परि मालिनी असे माझें नाम' हा पाठ चांगलासा नाहीं. ४. 'अधम' हा पाठच चांगला. ५. वारुळ. सर्प राहण्याचें ठिकाण. नागाच्या मस्तकावर मणी असतो असा प्रवाद आहे. 'व्याळविवरीं' असा चांगला पाठ इतरत्र आहे. ६. योगानें ज्यास अमानुष शक्ति प्राप्त झाली आहे, अशा पुरुषाची. **दृष्टांत** पहा. ७. अग्नीसारखा लाल. लक्षणेनें 'हुताशन' म्हटलें आहे. ८. गंधर्वांच्या. ९. थापा. १०. भिजविण्याचें कृत्य. पृथ्वीला स्नान घालण्याचें कृत्य. ११. 'अतुर्बळी' असा पाठ आहे. अतुर्बळी=अतिशय बळकट. १२. सैन्यासह. १३. युद्ध करून त्याचा पराभव करीन. १४. मींच बसविलेला. मी नाचवितों तसें नाचणारें भावलें. १५. ठाऊक करून घे. आपल्या मनाशीं खूणगांठ घालून ठेव. १६. हें भाषण औद्धत्यदर्शक आणि बलात्कारसूचक आहे. सामदाम थकले, तेव्हां हे कीचक 'फक्कड' आतां दंडास्त्राची योजना करित आहेत ! 'पाटाची' असा पाठ घेतला तर कीचकाच्या सौजन्याची कमालच झाली ! पट्टराणी असा तर त्याचा भाव नव्हे ?

विसां भुजांचा **रावण** । करितां परस्त्रीअभिलाषन । [1]परिवारेंसीं भस्मला. ॥ ३८ ॥ सहस्र भुजांचा [2]**कार्तवीर्य** । जगीं मिरवी आपुलें शौर्य । अस्त तोही पावला, सूर्य । [3]राहूवदनीं जयापरी. ॥ ३९ ॥ **संद** [4]**उपसंद** दोघे बंधू । आपुल्या हातें पावले वधू, । [5]अन्यायवर्ती तया बाधू । **ईश्वरची** करी प्रयत्नें. ॥ ४० ॥ **शुंभ निशुंभ** महाबळी । **शक्तीहस्तें** नि[6]र्माले दळीं, । तूतें मृत्यू पातला जवळीं । म्हणोनि [7]ऐसें उदेलें.' ॥ ४१ ॥ ऐसें बोलतां **याज्ञसेनी** । **कीचक** क्षोभला [8]बहुतागुणीं; । जैसा घृतें [9]सिंपिला वन्ही । प्रज्वळे, तैसा [10]धांविन्नला. ॥ ४२ ॥ करीं कवळितां **पांचाळी** । [11]सांडोनि चालिली नि[12]राळी, । धांवोनि येतां सभेजवळी । [13]सभालोकीं देखिली. ॥ ४३ ॥ सभे भूपाळ महाजन, । **धर्म, पार्थ, भीमसेन,** । देखत असतां तो दुर्जन । परम अन्याय [14]राहाटला. ॥ ४४ ॥ **कृष्णा** येतां मुक्तकेशी । **कीचक** धाविन्नला पाठीसी । लात ताडोनियां कुशी । अधोवदनें [15]पाडिली. ॥ ४५ ॥ करूनी [16]पतिव्रताहानी । **कीचक** पाडूं पाहे [17]व्यसनीं, । हें देखोनी **याज्ञसेनी** । स्तवन करी **सूर्याचें**. ॥ ४६ ॥ म्हणे, '[18]अज्ञानतमनाशना ! । [19]आप्तरूपा ! सहस्रकीर्णा(किरणा)! ।

---

१. आप्त, इष्ट, मित्रांसह. २. परशुरामानें याचा घात केला. कार्तवीर्यानें जमदग्नीची कामधेनु बलात्कारानें हरण करण्याचा प्रयत्न केला होता. ३. सूर्याचा ग्रास राहू करितो अशी जुनी समजूत आहे. राहु=छाया असें भास्कराचार्य व आधुनिक ज्योतिषी समजतात. ४. 'सुंदोपसुंद' असें पुराणांतरीं आढळतें. कदाचित् कवीच्या लेखकानें 'सुंद' असें लिहिलें असेल व त्याचाच भ्रष्टाकार होऊन 'संद' यास जन्म मिळाला असेल! एका स्त्रीवर दोघांचें प्रेम बसल्यामुळें भांडण होऊन त्यांनीं एकामेकांचा वध केला. ५. अन्यायानें वागणारा. 'प्रयत्नें' हा शब्द सर्वशक्तिमान् परमेश्वराला कां बरें लावला? लीलेनें दुष्टांचा तो घात करितो अशी समंजस समजूत आहे. ६. निर्माल्य झाले, मेले. ७. असले ढंग तुला आठवले! ८. अनेकपटीनें, फार. ९. 'शिंचिता' असा पाठ चांगला. **दृष्टांत** सुरेख आहे. १०. धांवता झाला. ११. सुटून. Slipped through. 'झाडोनि' असा दुसरा पाठ आहे. १२. एकीकडून. १३. सभेंतील लोकांनीं. १४. वर्तला. 'राहटणें' हा शब्द उपयोगी आहे. १५. असला अधमपणाचा निंद्य प्रकार राजसभेंत झाला, द्रौपदीस कौरवसभेंत दिगंबर करण्याचा प्रयत्न झाला, यांवरून व आणखी कांहीं उदाहरणांवरून भारतकालीन लोकांविषयीं आपला काय ग्रह होतो बरें? १६. पातिव्रत्याला, पतिव्रताला हानी करून; त्याचा घात करून. १७. संकटांत. १८. अज्ञानरूपी तमाचा नाश करणाऱ्या! सर्वसाक्षी सूर्य आहे, व म्हणून अज्ञान घालविणारा आहे. **श्लिष्ट** ही स्तुति अर्थातच सहेतुक आहे. १९. हित करणाऱ्या. 'आत्मरूपा' असाही पाठ आहे.

कीचकाचिया महाव्यसना- । पासोनि मातें सोडवीं.' ॥ ४७ ॥ कृपाभरी दी-नानाथ । प्रेरिता झाला राक्षसदूत, । कीचकें लावितांचि हात । आड झाला तत्काळीं. ॥ ४८ ॥ आड होतां विशाळ मूर्ती, । द्रौपदी निघोनी गेली पैं-रती । कृपेनें वोळला गभस्ती । महाअरिष्टा वारिलें. ॥ ४९ ॥ पुढें ते कीचकानें मारिली लात । पुढतीं पातला सूर्यदूत । कीचक लोटोनियां, व्यस्त । पृथ्वीतळीं पाडिला. ॥ ५० ॥ कीचकभयें सभास्थानीं । शब्द बोलों न शके कोण्ही, । धर्मराज अधोवदनी । भीमार्जुना विलोकी. ॥ ५१ ॥ द्रौपदी म्हणे, 'विराटराया! । वसों आलों तुझीया ठाया, । तुजपुढें अन्यायकर्तया । शिक्षा कैसी न करिसी?' ॥ ५२ ॥ विराट म्हणे, 'स्त्रीचरित्र । नकळे प्रकट गुह्य मंत्र, । कैसें एकांतींचें सूत्र । तें नेणवे आमुतें. ॥ ५३ ॥ प्रथम मिळोनी संवादीं । मग प्रवर्ते जरी निषेधीं । तेथें ऐसी होय उपाधी । अंगीं घडे लौकिकी.' ॥ ५४ ॥ वस्त्रें आच्छादून वदन । द्रौपदी करी दीर्घरुदन । हें देखोनी भीमसेन । वृक्ष पुढें विलोकी. ॥ ५५ ॥ कंक आणी बृहन्नळा । म्हणेती, 'स्वस्थ गा वीरपाळा!' याचें उसणें, स्वल्पकाळा । प्राणनाश पावेल.' ॥ ५६ ॥ धर्म म्हणे, 'वो महासती! । जाउनी सांगें सुदेष्णेप्रती. । ते बंधूतें विवेक, निती, । हितोपदेश बोधील.' ॥ ५७ ॥ परम दुःखें शोक करित । सुदेष्णेतें जाणवी मात, । ते म्हणे, 'त्याचा मनोरथ । न होतां, अनर्थ रोकडा. ॥ ५८ ॥ नायकसी त्याचें वचन ।

१. दयेनें. २. सूर्य. अनाथवत्सल. दीना+नाथ. द्रौपदी दीना होती. ३. मध्यें आला. ४. पलीकडे, दूर. ५. वळला. प्रसन्न झाला. ६. 'पुढतीं' हा पाठ प्रशस्त. ४५ ओवींत लाथ मारली असें असून येथें ही पुनः मारली कीं काय? कांहीं प्रतींत ४५ वी ओवी नाहीं, तेंच बरोबर दिसतें. तरी पण 'पुढतीं' असा शब्द निराळी कल्पना उत्पन्न करितो. ७. उलथा पालथा. ८. खालीं मान घालून. धर्मराजाचें वर्तन व्यवहारास अनुसरूनच झालें, पण प्रेम व स्नेह यांस अनुसरून झालें नाहीं. ९. 'आल्यें' असा पाठ प्रसंगास योग्य झाला असता. अनेकवचनी प्रयोग येथें उचित नाहीं. व 'आलें' हा पाठ इतर प्रतींत आहेही. १०. अन्याय करणाऱ्याला. ११. 'स्त्रियश्चरित्रं···देवो न जानाति कुतो मनुष्यः' हें आमच्या स्त्रियांच्या विरुद्ध विराटादि भ्याड पुरुषाभिमान्यांचें शस्त्र आहेच! तुम्हीं गुप्त कारस्थानें काय करितां आणि लौकिकांत कसें वागतां हें समजत नाहीं. तुमचें एकांतांत काय ठरलें होतें व भांडण कां झालें हेंही समजत नाहीं! १२. वृत्तांत. भांडणाचें कारण. १३. संवादीं मिळून=होय म्हणून. १४. संकट; फजीती. १५. भीम सुद्धां शस्त्रास्त्रें बघूं लागला, एकदम उठला नाहीं! संकटामध्यें प्रेमपाश इतके विस्कळित होतात काय? १६. 'म्हणेती' हें जुनाट रूप आहे काय? 'म्हणती' असाही पाठ आहे. १७. सूड. लवकरच याचें प्रायश्चित्त त्यास मिळेल. १८. ठेवलेला. 'रुच्=प्रकाशणें'पासून 'रोकडा' शब्द झाला.

तरी तो घेईल तुझा प्राण. । येथें माझें आज्ञावचन । न चले जाण सुजाणे! ॥ ५९ ॥ द्रौपदी खोंचोनियां चित्तीं । म्हणे, 'बरवी निवडिली नीती! । जे जैसीं कर्मे करिती । तैसे पावती फळभोग.' ॥ ६० ॥ कीचक भगिनीलागीं म्हणे, । 'सैरंध्रीतें त्वां शिकवणें । अंगसंग न देतां, प्राणें । उरों नेदीं सर्वथा.' ॥ ६१ ॥ यानंतर निशाकाळीं । कृष्णा पातली धर्माजवळी, । हृदय पिटुनी पाणीतळीं । शोक करी आक्रोशें. ॥ ६२ ॥ तुमचें पुरुषत्व काय झालें? । नामरूपातें बुडविलें; । रंकाचेंही ऐकत्व आलें । भणंग केलें प्रारब्धें. ॥ ६३ ॥ रांया! द्रौपदाची आत्मजा । भगिनी होय श्रीकृष्णराजा । पांचा पांडवांची भाजा । श्रेष्ठ श्नुशा(स्नुषा?) पंडूची. ॥ ६४ ॥ सभेंत समस्तां देखत । कीचकें मातें मारिली लात, । आतां तुमचा पुरुषार्थ । कोण येईल उपयोगा?॥६५॥ खांडव वनातें जाळिलें, । निवातंकवचांतें वधिलें, । अवघेंच तें वांयां गेलें । मज कीचकें ताडितां! ॥ ६६ ॥ तुमचें धनुष्य आणि बाणू । वेगीं ब्राह्मणा देइजे दानू, । पुरुषां देखतां कुलांगनू । नीचपुरुषें गांजिली! ॥ ६७ ॥ दिव्यास्त्रातें साधिलें, । युद्धीं शिवातें तोषविलें, । तें अवघेंचि वांयां गेलें । मज ताडितां कीचकें! ॥ ६८ ॥ हेडंब बकातें मारिलें, । किर्मीर जटासुरातें वधिलें ।

१. उत्तम उपदेश सांगितला बाईसाहेब! राजपत्नीचा हा उपदेश! एका कीचकानें सर्वांच्या नीतीपुढें आच्छादन धरून आपली शक्ति मिरवावी आँ! २. प्राणानें राहूं देणार नाहीं. द्रौपदीला जिवंत ठेवणार नाहीं कां मी मरेन? वहिणीजवळ भाऊ हें बोलतो! ३. हातानें बडवून घेऊन. पीडन करणें. ४. कुलशीलाला बट्टा लाविला. ५. रंकाच्या योग्यतेस आला. 'रंकत्व' असा सोपा पाठही आहे. ६. भिकारी. भिकाऱ्याला नीति कसली? ७. द्रौपदीचा हा पुढील शोक वाचून कोणा पुरुषाच्या अंगांत क्रोधाचें वारें शिरणार नाहीं? आपल्यावर पुनः वनवासाची पाळी येईल या भीतीनें प्रकट झालेलें पांडवांचें नष्ट पुरुषत्व खरोखर गर्हणीय आहे. द्रौपदीचा प्रत्येक शब्द हृदयास घरे पाडणारा आहे. प्रत्येक विशेषण सार्थ आहे. ८. येथें **सार** अलंकार आहे. ९. वाचक सुद्धां हेंच विचारतील! १०. 'निवातकवच' असें पाहिजे. हे दोघे बंधु प्रऱ्हादाचे पुतणे. इंद्रासही हे अजिंक्य होते. अर्जुनानें यांचा वध केला. ११. हा द्रौपदीचा उपदेश धनुर्धारित्वाचें व्यर्थत्व उघड करितो. ब्राह्मणास दान करणें म्हणजे आपण त्यास मुकणें आणि ब्राह्मणाच्या हातूनही त्याचा उपयोग होणार नाहीं असें पाहणें होय. १२. बायका नवऱ्यास पुरुष म्हणतातच! पांडव हे त्या वेळीं कोणत्या अर्थानें पुरुष होते हें त्यांचें त्यांसच ठाऊक! हें पद्य कांहीं प्रतींत पुढें आहे. ह्या भाषणांत मागचें पुढें व पुढचें मागें बरेंच करावयास पाहिजे. १३. द्रौपदी भीमास अनुलक्षून बोलते.

तें अवघेंचि वायां गेलें । मज ताडितां कीचकें ! ॥ ६९ ॥ पौलोम[1], काळयातें वधिलें, । जयद्रथातें[2] विटंबिलें, । तें अवघेंचि वांयां गेलें । मज ताडितां कीचकें ! ॥ ७० ॥ स्वयंवरीं जिंकूनियां पण । हरिला कौरवांचा मान, । तें अवघेंचि जालें शून्य । मज ताडितां कीचकें ! ॥ ७१ ॥ जोडिलें यशाचें परमान्न[3], । कोण्ही न सेविती पवित्रजन[4], । स्पर्शलें दुष्ट कीचक श्वान । पांचाळीतें म्हे[5]-णोनी. ॥ ७२ ॥ केला राजसूय यज्ञ, । दानीं तोषविलें त्रिभुवन, । 'तें अवघेंचि जालें शून्य[6] । मज ताडितां कीचकें !' ॥ ७३ ॥ धर्म म्हणे, 'ऐक गुह्यार्थ[7], । भीमसेना जाणवीं मात, । करील दुष्टाचा निःपात । अर्धक्षण न लगतां. ॥७४॥ चारीमास[8] (दोन मास ?) दिवस गणणें । उरलें, म्हणोनि पडलें साहणें[9] । एरव्हीं आतां कीचक प्राणें । जाता, जाण तत्काळीं[10]. ॥ ७५ ॥ आतां स्वस्त[11] करीं मना, । वृत्तांत जाणवीं भीमसेना, । करील कीचकाचिया हनना । हें निर्धार[12] जाण पां !' ॥७६॥ ऐसें दोघें संवादती । शय्यासदनाच्या[13] एकांतीं; । तंव तेथेंचि दैवगती[14] । भीम-सेन पातला. ॥ ७७ ॥ द्रौपदी शोकें अतिसंतप्त । नेत्रीं ढळती[15] अश्रुपात, । भीम म्हणे, 'होईं स्वस्थ[16] । विचारवंते ! सुजाणे ! ॥७८॥ दुःशासनें कवळिलें केशा, । सैंधवें[17]

१. पुनः अर्जुनास बोलते. २. पुनः भीमास उद्देशून बोलते. ३. दूध व साखर यांत तांदूळ शिजविले म्हणजे 'परमान्न' नांवाचें पक्वान्न होतें. ही आपली खीरच होय. यशही पांढरें आणि दूध, साखर, व तांदूळ हे सर्व पांढरेच पदार्थ ! तेव्हां यशाची शुभ्रता दाखवि-ण्यास हा समुदाय किती सुंदर आहे ? ४. साधुसंत. ५. दुष्ट जनांस ज्या गोष्टी दुर्घट त्या दु-ष्टांस सुघटच होतात ! 'Fools rush where Angels fear to tread. ह्या अर्थाशिवाय दुसराही अर्थ संभवतो. तो असाः—कीचकासारखें श्वान शिवून माझ्या पवित्र यशाचें त्यानें मातेरें केलें म्हणून माझें यश आतां साधुसंत गाणार नाहींत. ६. सर्व व्यर्थ झालें. द्रौपदी संतप्त झाली आहे, म्हणून तिच्या बोलण्यांत संदर्भ दिसत नाहीं. ७. गुप्त गोष्ट; गुप्त युक्ति. शक्ति नसलेलीं माणसें युक्तींत पटाईत असतात ! ८. 'चारमास' हा पाठ बरा. 'गणने' हाही पाठ अर्थ सुलभ करितो. अज्ञातवासाच्या गणनेला (दिवसांच्या संख्येला) चार महिने उरले आहेत असें धर्म सांगत आहे. ९. सोसणें. १०. त्याच वेळीं. ११. 'स्वस्थ' असा पाठ कोठेंही नाहीं. पण अर्थ तोच आहे. १२. हाच निश्चय जाण बाई ! 'सिद्धांत' असाही अर्थ होईल. 'निर्धार' यास 'निर्धारें' असें रूप दिलें तर 'निश्चयानें, खरोखर जाण' असा अर्थ होईल. आमचे कवि व्याकरणाच्या भानगडींत फारसे पडत नसत. १३. Bed-room याला हा समानार्थक शब्द होय. १४. अकस्मात्. आपल्याला ठाऊक नसणाऱ्या कारणापासून कांहीं कार्य झालें म्हणजे आपण त्यास 'दैवगती' म्हणतों. येथें 'दैवगती' हें तृतीयेचें रूप अगर क्रियाविशेषण आहे. १५. खालीं पडत आहेत. १६. काळजीरहित हो. आर्जवाची भाषा ही. १७. जयद्रथें.

दिधलें अपार क्लेशा । तयाची ऐसी मानूनि देशा । आमुच्या अंगीं लावणें.॥७९॥ असो जें बोलसी उत्तरीं । तितुकें हीनत्व आमुचे शिरीं । पुढें कृपा करील हरी । तरी हें संकट परिहारूं.' ॥ ८० ॥ द्रौपदी म्हणे, 'प्रतापरुद्रा! । भुवनत्रयीं बळसमुद्रा! । कवण दोषांस्तव नरेंद्रा! । प्रतापातें ग्रासिलें. ॥ ८१ ॥ कीचक पडला असे डाई, । तो मज छळील समयोसमयीं । प्राण त्यागूं? किंवा कांहीं । उपाय असे तो सांगा. ॥ ८२ ॥ विराट वारूं न शके त्यातें, । सुदेष्णा त्याचिये विचारें वर्ते, । कोठें आश्रय न दिसे मातें । दुःखें कंठीं झोंबावया. ॥ ८३ ॥ अज्ञातवासाचिये संकटीं । रिघतां नये तुमचे पाठीं, । दुरी राहिला जगजेठी । कृष्ण माझा कुलावतंस. ॥ ८४ ॥ स्थळ त्यागुनी आणिके स्थळीं । जातां नये ईयेकाळीं'. । भीम म्हणे, "वो वेल्हाळी! । चिंता न करीं मानसीं. ॥ ८५ ॥ कीचक करील बळात्कारू । तरी त्याला सांगावा विचारू, । अवलंबोनी कृत्रिमाचारू । मिथ्या शब्दें मोहावा. ॥ ८६ ॥ 'नृत्यशाळे एकांत स्थळीं । तुवां यावें निशाकाळीं, । मीही येवोनियां जवळीं । इच्छा तुझी पुरवीन.' ॥८७॥ कीचकें तेथें केलिया शयन । माझें होईल आगमन, । पुढें होईल महाकथन । तें ऐकती समस्त." ॥ ८८ ॥ निशा क्रमुनीयां जाणा ।

---

जयद्रथानें द्रौपदीस एकदां बलात्कारानें नेण्याचा प्रयत्न केला होता. हा सैंधव सिंधुदेशाचा (सिंधाचा) राजा तर नव्हता? इंद्रप्रस्थाच्या व सौराष्ट्राच्या पश्चिमेस हा देश होता.

१. हल्लींचें संकट. 'दोष' असा पाठ आहे. 'तयाचि ऐसें मानूनि, दोष । आमचे आंगीं न लावणें॥' या पाठानें अर्थ स्पष्ट होतो. येथील पाठावरून भीम आपल्या साडेसातीस उद्देशून बोलतो असें दिसतें. २. 'उत्तर' याचा नेहमींच 'प्रश्नाचा जबाब' असा अर्थ नसतो. 'बोलणें' असाही अर्थ होतो. भीमाला सुद्धां या वेळीं वेदांत सुचला आहे. ३. 'दोष' याचा 'संध्याकाळ' असा अर्थ आहे. सूर्याला संध्याकाळ वज्रच होय! येथील श्लेष पहावा. 'दोष' व 'प्रताप' हे श्लिष्ट आहेत. 'कोण्या अगस्तीनें नरेंद्रा' असा तृतीय चरणाचा पाठ बळसमुद्रास उद्देशून आहे. ४. डाई पडणें=दावा धरणें. ५. वेळोवेळींचाच भाऊ हा! Every now and then. ६. काय विचारीवर संकट हें! ७. ज्या आश्रयाचे गळ्यांत (ज्याच्या स्वाधीन) मला दुःखांतले दिवस कंठतां येतील. 'दुःखें कंठूं जावे या' हा पाठ सुगम आहे. ८. कुलशिरोमणी, कुलश्रेष्ठ. अनाथाचें रक्षण करण्यास तातडीनें धांवणारा. हा कुलीनाचा धर्मच होय. 'कैवारी' हा पाठ उत्तमच होय. ९. वेल्हाळ (केलीनागर, चैनी पुरुष) यापासून 'वेल्हाळ' झाला. वेल्हाळी=प्रिये! कपटप्रयोगाला सुरवात करावयाची म्हणून 'वेल्हाळी' हा शब्द योजिला काय? १०. कपटनाटक. पुढें सांगितलेंच आहे हें नाटक. मानवती द्रौपदीस हें मानलें नसेलच पण 'वखत पडा बांका, तो गद्धेकू कहना काका' असा न्यायच आहे. ११. मोठी गोष्ट. A great event.

भीम गेला पाकसदना, । द्रौपदी आली सुदेष्णा । जिये स्थानीं उपविष्ट.[1] ॥८९॥ सुदेष्णा म्हणे, 'वो गुणसाजणी[2] ! । अत्यंत आवडसी माझे मनीं, । होवोनी माझी बंधुपत्नी[3] । मजसमान त्वां व्हावें. ॥ ९० ॥ कैंचे गंधर्व[4] ? कैंचे पती ? । असत्य बोलसी महासती ! । कीचकाचिये सुखसंगती । संपदा भोगीं मनइच्छा.[5]' ॥ ९१ ॥ खेद पावोनी अंतरीं । बाह्य[6] कृत्रिम[7] हास्य करी, । सुदेष्णा टाळी पिटी करीं । मिळे विचारीं[8] म्हणोनियां. ॥ ९२ ॥ 'व्यर्थ जातसे तारुण्यकाळ, । नये वेचितां कनकाचळ,[9] । कीचकसंगीं करीं सुफळ । आग्रह सांडीं मानसीं[10]. ॥ ९३ ॥ कीचक निपजवूनि अन्ना । सुरा[11] पाठवी मज प्राशना, । तुवां जाऊनियां त्याचिया सदना । निशाकाळीं आणावें.' ॥ ९४ ॥ यावरी भगिनीचिया राउळा[12] । कीचक पातला उतावेळा,[13] । विरहतापें गोळांगुळा[14]- । सारिखा दिसे विकारी[15]. ॥९५॥ मद्यपानें झांकली दृष्टी, ।[16] .... .... .... । भगिनीसी म्हणे, 'हे गोरटी । .... .... .... ॥ ९६ ॥ प्रबोधोनी नानायुक्ती । अपार वोपीन धनसंपत्ती । अंगना होवोनि कामना रती । पुरवी, ऐसें करावें.' ॥९७॥ ते म्हणे, 'माझीया एकांत सदनीं । तूंचि बोधीं मधुरवचनीं'. । म्हणोनि बैसविलीं दोन्हीं । अंतरगृहीं संवादा. ॥ ९८ ॥ कीचक म्हणे, 'सुकुमार[17] वनिते ! । सभास्थानीं

---

१. बसलेली होती. २. 'सज्जन'पासून 'सजणा' झाला. काय सुदेष्णेचीं वाक्यरत्नें हीं! ३. भावजय. 'कृतकृत्य व्हावें' हाही पाठ आहे. 'माझ्या सारखी हो' म्हणजे काय? पट्टराणी? ४. व्यावहारिक मनुष्यांस श्रेष्ठ नीतीच्या गोष्टी काय होत? ५. मनमुराद. ६. बाहेरून. द्रौपदीस कपटवेषाचा हा पहिलाच प्रसंग होता. ७. खोटें. खरें नव्हे तें, केलेलें. हें पाहून सुदेष्णा खुलली कशी ती पहा. ८. आपल्या बेतास अनुकूल झाली म्हणोन. विचारीं मिळणें=To be agreeable to a proposal. ९. मेरूइतका सुवर्णाचा संचय खर्चिला तरी पुनः परत येत नाहीं! भोगासक्तांच्या काय विलक्षण कल्पना ह्या! १०. मनामधील. ११. हा काय परिपाठ होता? भारतांत याचा असा उल्लेख नाहीं. १२. 'रायालय'-पासून 'राऊळ.' राजगृह. देवळासही 'राऊळ' म्हणतात. १३. 'उत्ताम्यत्'पासून 'उतावेळा.' १४. वानर. १५. विकारवश. १६. येथील शब्दयोजना मदोन्मत्त वानराची क्रिया दर्शविणारी असून अत्यंत अश्लील आहे. ते शब्द घेतले नाहींत याबद्दल समंजस रसिकांनीं आमचे आभार मानावे. कवीचें शब्द जसेच्या तसे देणें हें न्याय्य होय. पण त्यांतही मर्यादा आहे. मद्यप्याचें कृत्य पशूपेक्षांही जास्त बीभत्स असतें. यांतच समजून घ्यावें. १७. सुकुमार म्हणून लाथ मारणें हें कीचकास शोभे! शारीर बळानें सर्व गोष्टी साध्य होतात हा कीचकाचा समज, तारुण्यांत चैन करावी हा सुदेष्णेचा समज आणि विराटाचा नबळेपणा हे या मनुष्यांस कसे शोभतात? एकमेकांस अनुरूप अशाच या जोड्या विधात्यानें निर्माण केल्या होत्या!

ताडिलें लाते, । सामर्थ्य नऱ्हेचि कवणातें । वारावया मजलागीं. ॥ ९९ ॥ आतां करीन बलात्कारू । तरी मज कोण शके वारूं? । पश्चात्ताप पावोनि थोरू । सखी! (शेखीं?) मातें वरसील. ॥ १०० ॥ सहस्र [1]निष्क सुवर्ण रासी । तुज वोपीन प्रतिदिवसीं, । शतकें शतक दासदासी । सेवेलागीं देतसें.॥१०१॥ एकशत कनकरथ, । शतकुंजर मदोन्मत्त, । शत वाजी साळंकृत । चालवीन तुजपुढें. ॥ १०२ ॥ अमोल्य रत्नाचीया रासी, । अन्नें सेवीं रुचती तैसीं, । [2]पें-रीमळ मर्दुनी अंगासीं । अभ्यंग करीं, डोळसे! ॥ १०३ ॥ [3]नक्षत्रसमान रत्नमाळा । [4]आवडीं घालीन तुझीया गळां, । लेववीन कटीमेखळा । माणीक मणी [5]सुजडीत. ॥ १०४ ॥ [6]गंधर्व पातल्या कैवारा । छेदीन पांचांचिया शिरा, । माझीया बळाचा दरारा । देवां दैत्यां ठाउका. ॥ १०५ ॥ आतां संशय सांडोनी मनीं । वैस माझिया [7]अंकासनीं, । गाढालिंगन चुंबनीं । ताप शमवीं, वल्लभे! ॥ १०६ ॥ [8]लागतसें तुझीया पाया, । मातें वोपीं सुंदर काया, । माझी होऊनि [9]वडील जाया । भाग्य भोगीं इंद्राचें.' ॥ १०७ ॥ द्रौपदी म्हणे, 'आतां ऐकें, । [10]मांगां उपेक्षिलासी मुखें । तें गंधर्व आणि [11]लोकशंके । [12]शंकोनीयां जाण पां. ॥ १०८ ॥ आतां पुरवीन तुझिया [13]आर्ता । असें पातलें असे चित्ता, । तुवां सांडोनियां चिंता । स्वस्थ मानसें असावें. ॥ १०९ ॥ आणावया भक्ष [14]मदिरा । सुदेष्णा धाडील तव मंदिरा, । ते वेळीं सांगेन विचारा । त्या संकेतें वर्तावें.' ॥ ११० ॥ ऐकोनि सैरंध्रीची गोष्टी । कामातुर [15]आल्हाद पोटीं । 'त्रैलोक्याचे [16]राज्यपटीं । बैसलों' ऐसें मानितू. ॥ १११ ॥ दिवस गेलिया अस्तातें । सुदेष्णा म्हणे सैरंध्रीतें, । 'तृषा लागली असे मातें, । मद्य आणी प्राशना. ॥ ११२ ॥ जाऊनियां कीचकाच्या घरा । आणीं भक्ष आणी मदिरा, । [17]अप्रीत उपजे त्या प्रकारा । नाचरावें शाहाणीये!' ॥ ११३ ॥ येरी म्हणे, 'वो [18]जनस्वा-

---

१. सोनें रुपें तोलण्याचें वजनविशेष. ही पातिव्रत्याची किंमत पहा! २. सुवासिक द्रव्यें. ३. ही **उपमा** किती सुरेख असते. ४. आवडीनें. ५. चांगले जडलेले. ६. गंधर्वभीति नाहींशी करण्याची ही तोड! ७. मांडीवर. ८. आतां आर्जव सुरू झालें. हा **परिवृत्ति** अलंकार. ९. पट्टराणी. 'वृद्धा'चा 'वडील' झाला. १०. पूर्वी मीं तुझा धिक्कार केला. ११. लोकलज्जा. १२. भिऊन. १३. वळकट इच्छा. काय वाटलें असेल द्रौपदीला हें बोलतांना? १४. दारू. १५. आल्हादला, हरपला. १६. गादीवर. १७. असमाधान, द्वेष. हें सुभाषित चांगलें आहे, पण प्रस्तुत प्रसंगीं अनुपयोगी होय हें सुदेष्णेस काय ठाऊक! १८. द्रौपदीनें 'तुजपाशीं अनेक सेवक आहेत' हें सुचविण्यासाठीं 'जनस्वामिणी' म्हटलें काय?

मिणी! । परिचारिका पाठवीं कोण्ही, । भक्ष आणि मद्य दोन्हीं । क्षणें आणील तव आज्ञा.' ॥ ११४ ॥ येरी म्हणे, 'वो शुचिस्मिते[1] ! । तूंचि आणीं आपुले हातें, । आणिकें आणिल्या तें मातें । रुची[2] नेदी सर्वथा.' ॥ ११५ ॥ आग्रह जाणोनी वैंचनें[3] । कृष्णा गेली उद्विग्न मनें, । कीचकें(क?) सन्मानुनी मानें । म्हणे, 'वैसें आसनीं.' ॥ ११६ ॥ अति लगबगां धांवे धरूं, । ते[4] म्हणे, 'केला अंगिकारू[5], । स्वस्थ नावेक[6] घरीं धीरू । गुज कांहीं बोलतसें. ॥ ११७ ॥ बृहन्नळा नृत्यागारीं । दिवसा नाचवी[7] बहुत कुमरी, । रात्रीं आपुलाले घरीं । प्रवेशती सकळीक. ॥ ११८ ॥ तो एकांत[8] असे बरवा, । तो ठाव आणिकां न ठावा[9], । तेथें नेमिल्यां[10] काळीं तुवां । शीघ्र यावें ममाज्ञा. ॥ ११९ ॥ आजि मातें उपोषण, । नाहीं तांबूलभक्षण, । केलें नाहीं जळ प्राशन । नेम जाणे सुवृत्ती[11]. ॥ १२० ॥ उदईक होतां सूर्यास्तू । पूर्ण होईल मनोरथू, । हाची दोन्हीचा[12] संकेतू । नृत्यशाळे मिळूं[13] मिळणीं. ॥ १२१ ॥ जे कां कुंकुमतांबोलहीना, । रुदीत, क्षुधीत, दुर्मुखी, जाणा । भोगीं वैंजिली[14] अंगना । मन्वादिकीं निर्धारीं. ॥१२२॥ उदईक चारी प्रहर दिवसू । धैर्ये आंवरीं मानसू, । त्यानंतरीं सुखसंतोषू । जन्मवरी भोगिसी. ॥ १२३ ॥ गंधर्व अथवा अन्य लोकातें । प्रगट न करीं वारियातें[15], । तरीच येणें घडेल मातें । हें निर्धारें जाण पां. ॥ १२४ ॥ निबीड पाडिजे अंधकारू, । नै[16] कीजे शब्द साचारू.' । कीचक म्हणे, 'हा विचारू । मज बहुत मानला.' ॥ १२५ ॥ संतोष मानूनियां हृदयीं । आवडीं हस्त ठे-

---

१. 'शुचिर्भूत' हा पाठ द्रौपदी इतर दासींपेक्षां जास्त स्वच्छ असें सुचवितो म्हणून विशेष प्रशस्त आहे. २. काय लाडानें बोलते आहे सुदेष्णा! ३. ती बोलली त्यावरून. ४. द्रौपदी. ५. तुझ्या म्हणण्याचा अंगिकार केला, तुझें बोलणें मला मानवलें. पंतांनीं याच प्रसंगीं म्हटलें आहे. 'त्यासि खरें भासेसें प्रियशिक्षित सस्मित स्वयें वदली । परि कांपली सतीची तनु जैशी मंद मारुतें कदली ॥.' पंतांचें पातिव्रत्यावर केवढें निःसीम प्रेम हें! ६. क्षणभर. ७. नाचावयास शिकविते. ८. तें एकांतस्थळ. ९. माहित नाहीं. १०. ठरलेल्या वेळीं. At the appointed time. ११. 'सुव्रतीं'=चांगल्या व्रताचा—असा पाठ चांगला झाला असता. 'व्रताचा' असा एक पाठ आहे. सुवृत्ती=चांगल्या वर्तनाचा—असा अर्थ कीं काय? १२. 'दोघांचा' असा पाठ आहे. १३. एकवट होऊन जाऊं. १४. निषिद्ध म्हणून सांगितलें. भोगीं=भोगाला, उपभोगाला. १५. वाऱ्याला सुद्धां कळवूं नको. हें सगळें बोलणें कविनिर्मितच आहे. १६. 'न कीजे तिजियाचा संचारू' असा एक पाठ आहे, व तो विशेष सुबोध आहे.

विला[1] पायीं । आज्ञा देवोनि म्हणे, 'जायीं । शीघ्र येईं नेमातें.'[2] ॥ १२६ ॥ कृष्णा पाहोनि एकांत । भीमसेना जाणवी मात, । 'उदईक कीचक असे येत । नेम करूनि मंजलागीं;[3] ॥ १२७ ॥ नृत्यशाळे तो आलिया । तुम्हीं जावें तया ठाया.' । भीम म्हणे, 'माझीया कार्या । नलगे मातें सांगणें.'[4] ॥ १२८ ॥ सूर्योदयीं कीचक जाणा । पातला भगिनीच्या दर्शना, । म्हणे, 'आजि माझिया मना । परमानंद न [5]संडे. ॥ १२९ ॥ सैरंध्री देऊनियां अनुमोदना । आजी येतसे भोगसदना, । सूर्य न [6]वंचे अस्तमाना । [7]लागवेगें [8]मंदटू. ॥ १३० ॥ मुहूर्त[9] लोटतां सांज वेळे, । एकटा पातला नृत्यशाळे, । जैसा पाश घालूनि कांळें । मृत्युठाया वोढिजे.[10] ॥ १३१ ॥ चांदवा [11]बांधिला, सूर्यपुट । आड केलें, कपट पट । अरळ दाटलें घनदाट । हेममंचकीं स्वहस्तें. ॥ १३२ ॥ कामभोगाचे [12]तवंगें । डोळया पातया पातें न लागे, । विरहताप माजला अंगें । प्रळयानळासारिखा. ॥ १३३ ॥ उठे बैसे क्षणक्षणीं, । [13]सांचुल होतां भावी मनीं, । म्हणे, 'पातली याज्ञसेनी । नेमकाळीं नेमिष्टे[14].' ॥ १३४ ॥ यानंतरें अर्धराती । [15]भीम पातला [16]भद्रजाती, । कामीक म्हणे, 'परमप्रीती । वैसें मंचकीं वल्लभे!' ॥ १३५ ॥ म्हणे, 'उशीर लाविला बहुत.' । वक्षस्थळीं टाकिला हात । कठीण लागतां निभ्रांत[17] । काममोहें नोळखे. ॥ १३६ ॥ 'वाट पाहतां [18]शीणले नयन, । युगासमान वाटला क्षण, । आतां देईं आलिंगन । अंगसंगीं निववीं कां.' ॥ १३७ ॥

---

१. कीचकानें ठेविला. २. संकेताप्रमाणें. ३. माझ्यासाठीं? कीं माझ्याशीं नेम करून? ४. काय भीमाची उतावळी ही! ५. माववत नाहीं. मला अति आनंद झाला आहे. ६. जात नाहीं. 'वजे' हाही पाठ आहे. तुकारामाच्या अभंगांत हा शब्द फार वेळ येतो. ७. लवकर. कीचकाची घाई सहजच आहे. ८. मंद. ९. सायंकाळीं एक दोन घटका झाल्यावर. १०. कामांधाला ही उपमा कशी तंतोतंत लागू पडते. ११. येथील पाठ स्पष्ट नाहींत. 'कपटपट'बद्दल 'अभ्रकपाट' व 'शुभ्रपट' अशीं पाठांतरें आहेत. 'शुभ्रपट' हा पाठ बरा दिसतो. अरळ=अव्यवस्थित रीतीनें. आम्हीं विरामचिन्हें दिलीं आहेत त्यांवरून जो अर्थ निष्पन्न होतो तो बरा आहे असें वाटतें. मुळांत कीचक मागाहून आला आहे. 'दाटलें'बद्दल 'घातलें' पाहिजे. १२. 'तगवगें' हा पाठ चांगला. तगवग अगर तगमग=चैन न पडणें—हा अर्थ प्रसिद्ध आहे. १३. कांहीं खटखुट होतेंसें, चाहूल ऐकायला येतां. १४. संकेत पाळणारी. १५. मुळांत भीम आधींच जाऊन बसला होता असें आहे. १६. उत्तम आहे कुल ज्याचें? १७. कठिण लागलें तरी याला संशय उत्पन्न झाला नाहीं! काय भ्रांति ही! १८. थकले. 'शीण'शब्द 'क्षीण'शब्दापासून झाला. 'शीर्ण'शब्दापासूनही झाला असें कोशकार म्हणतात.

पुढा करूनियां वदना । घेऊं धांवे मुखचुंबना, । भीमें ताडिला [1]चडकणा । हस्तभारें निष्ठुरें. ॥ १३८ ॥ मग म्हणे, 'कोण रे! [2]धीट?' । ये[3]रू म्हणे, 'मी गंधर्वश्रेष्ठ. । द्रौपदीभोगाचा [4]स्वाधिष्ट । स्वाद [5]चाखवूं पातलों.' ॥ १३९ ॥ हस्त धरूनि [6]हिसडिला, । तव कीचक झोंबीयें मिसळला, । दोघां संग्राम माजला । अत्यद्भुत ते काळीं. ॥ १४० ॥ [7]अंतरें पाहे पांचाळी । तव दोघे मिसळले [8]केशींकवळीं, । मुष्टी मारितां वक्षस्थळीं । धरातळीं थरकंपु. ॥ १४१ ॥ घाय घालिती परस्परें, । दणाणती दिगंतरें, । महाप्रासादांचीं शिखरें । खचोनि पडती दडदडा. ॥ १४२ ॥ [9]लोकें म्हणती, '[10]महांमारी । कोठोनि पातली इये नगरीं?' । कोण्ही न निघती बाहेरी । भयें [11]अंतरीं दडाले. ॥ १४३ ॥ उडोनि हृदयीं मारिली लात । वक्षस्थळीं मुष्टिघात । पृष्ठीं ताडितां [12]निर्घात । दणदणाट माजला. ॥ १४४ ॥ कोपर, हुमणीया, चपेट । ताडितां अस्थि होती कुट; । कीचक म्हणे, 'भरीन घोंट[13] । मित्रावर्णासारिखा.' ॥ १४५ ॥ भीम म्हणे, 'नृसिंहें [14]तंबकें । [15]असूर विदारिला नखें, । तैसें अंग एकून एकें । छिन्नभिन्न करूनि टाकीन.' ॥ १४६ ॥ शत्रू [16]नवनागसहस्रबळी । भीमें कवळितां [17]कंठनाळीं । बळें ताडूनि बाहुबळीं । हस्त उखळोनी टाकिला. ॥ १४७ ॥ भिडती नक्र आणि [18]गजेंद्र, । शरभपक्षी आणि [19]मृगेंद्र, । [20]रतासुर आणि देवेंद्र, । [21]मूळवैरी झुंजती. ॥ १४८ ॥ [22]महामाया महिषासुर, । शंकर आणि [23]अंधकासुर । हनुमंत आणि [24]अखयाकुमर । [25]अशोकवनीं ज्यापरी. ॥ १४९ ॥ पूर्वीं सुग्रीव आणि वाळी । [26]झुंजिन्नले [27]किस्किंदातळीं । तैसा कीचक आणि भीम बळी ।

---

१. चपराक मोठ्यांदा थोबाडींत मारिली. २. उद्धट. ३. भीम उत्तर देतो. ४. मधुर. ५. तुला चाखूं द्यायला. ६. जोरानें ओढला. ७. गुप्तरूपें. ८. केश ओढण्यामध्यें. ९. इतर पुस्तकांत ही ओवी १५८ वी आढळते. १०. मोठी महामारी? ११. गृहामध्येंच. १२. ठोसे, धक्के. १३. घोंट=चूळ. मैत्रावरुण (अगस्त्य ऋषी) असें पाहिजे. १४. क्रोधानें, सामर्थ्यानें. १५. हिरण्यकशिपु. १६. नऊ हजार हत्तींचें आहे बळ ज्याला. १७. नरडें धरून. १८. गजेंद्रमोक्षाची कथा सांगावयास नकोच. १९. सिंह. शरभपक्षी सिंहास मारतो अशी पौराणिक समजूत आहे. २०. 'वृत्रासुर' हा इतरस्थ पाठ चांगला आहे. २१. जन्माचे वैरी. **दृष्टांत** खासे आहेत. २२. आदिमाया, भवानी. २३. कैलासावर स्वारी करून पार्वतीचें हरण करूं इच्छिणारा राक्षस. यास शंकरांनीं मारिलें. २४. रावणाचा मुलगा. याचें नांव अक्ष. मराठींत 'अखया' झाला. २५. लंकानगरींतील एक उपवन. येथेंच सीतेस ठेविलें होतें. २६. झुंज करिते झाले. २७. ही वाळीची राजधानी होती.

युद्धकंडना[1] मिसळले. ॥ १९० ॥ भीम म्हणे, 'आंगवणें[2] । दाऊनि, शेखीं जासी प्राणें, । जैसीं व्याधाप्रती हरणें । शिंगें पुढां झाडिती. ॥ १९१ ॥ मागें सरोनी धांवती पुढें । हृदयीं थडका मारिती गाढे[3] । एकमेकां ईडेपाडे । महापर्वत पैं जैसे. ॥ १९२ ॥ यानंतर भीम जगजेठी । वर्मस्थळीं सहस्रमुष्टी । बळें ताडितां, भूतटीं । मूर्छा दाटोनि पडियेला. ॥ १९३ ॥ पुढती उचलोनियां, शीरीं । भोवंडोनी[6] टाकिला पृथ्वीवरी । सव्यपाय[7] 'देवोनि[8] उरीं[9] । हस्त दोनी उपटिले. ॥ १९४ ॥ अंगुष्ठ रोवोनि नाभीस्थानीं । छेदोनि, सांडिले चरण दोनी, । शीर पिळोनियां धरणी । भिन्न करूनि टाकिलें. ॥ १९५ ॥ जैसा किरात शस्त्रघातें । चारी पाद ग्रीवा हंतें[10] । छेदोनियां कूर्मातें[11] । भिन्न करी भक्षावया. ॥ १९६ ॥ तैसें[12] निर्वटूनि[13] अस्थिजाळ । शीर केलें गोळांगुळ.[14] । सोडले रक्ताचे खळाळ । नदीलोटासारिखे. ॥ १९७ ॥ सुरीं[15] गर्जोनि जयजयकारीं । पुष्पें टाकिलीं भीमावरी । म्हणती, 'मारूनि कौरव[16] वैरी । जगीं होय यशस्वी. ॥ १९८ ॥ समय होतां प्रातःकाळा । भीम प्रवेशला पाकशाळा । पुढील निरूपण भूपाळा ! । जन्मेजया ! परियेसीं. ॥ १९९ ॥ यापरी झाला कीचकवधू, । पुढां 'वधिजेति[17] त्याचे बंधू । तेही कथेचा विनोदू[18] । श्रोतीं सादर परिसावा. ॥ १६० ॥ इति श्रीविराटपर्व भारत । कथारूप[19] परमामृत । सज्जन ते सोमकांत । प्रेमोदकें पाझरती. ॥ १६१ ॥ मुक्तेश्वराची सुवाणी । पुष्पलतिका कांचन[20] सुमनी, । लीलाविश्वंभर गुरुचरणीं । अर्पूनि, अर्पी श्रोतयां. ॥ १६२ ॥

---

१. युद्धांतील मारामारीला. दुसरा पाठ आहे पण याच अर्थी आहे सबब दिला नाहीं. २. आंगची शक्ती. शेखीं=शेवटीं. ३. हे दोघे युद्धपंडित. ४. सर्वत्र हाच पाठ आहे. 'वीरश्रीनें, शरीरीनें' असा अर्थ करावा. ५. वळकट मूर्च्छना येऊन. ६. गरगर फिरवून. ७. डावा पाय. ८. 'रोवोनि' हा पाठ चांगला. ९. नाभिस्थान कापून? सांडले=उपटून टाकिले? कीं नाभींत खुपसले? १०. हातानें. ११. कांसवाला. १२. मुळांत असें आहे. 'तं संमथितसर्वांगं मांसपिंडोपमं कृतम्.' १३. नाहींसें करून. १४. 'मांसगोळ' (मासाचा गोळा) असा पाठ आहे. १५. देवांनीं. १६. कौरव हेच वैरी त्यांस मारून. १७. मारिले जाणार आहेत. १८. मनोरंजक चमत्कार. १९. येथें कांहीं पाठभेद असावा असें वाटतें. 'सोमकांत'च्या ऐवजीं 'सूर्यकांत' असता तर 'अमृत' याचा 'सूर्य' अर्थ घेऊन सूर्यकांत पाझरतो असें म्हणतां आलें असतें. २०. सुवर्णपुष्प.

## अध्याय चवथा.

प्रातःकाळ होतां प्राप्त । द्रौपदी राया जाणवी मात,[1] । सकळ ऐकवी वृत्तांत । महाअनर्थ रात्रीचा. ॥ १ ॥ 'कीचक कामभावार्थी[2] । पातला नृत्यशाळेप्रती । पंचगंधर्वे माझे पती । तीहीं मारोनि सांडिला.[3] ॥ २ ॥ प्रेत पडलें असे धरणी । तें जाऊनि विलोका नयनीं, । सकळ[4] कर्तव्य आप्तजनीं । शीघ्र केलें पाहिजे.' ॥ ३ ॥ ऐसी ऐकतांचि गोष्टी । धांवल्या पौरजांच्या थाटी,[5] । नारीनरांची बहु दाटी । नृत्यशाळे नै[6] समाय. ॥ ४ ॥ ब्राह्मण, क्षत्री, वैश्य, शूद्र, । चांटी,[7] सोनार, शिल्पिकार, । कोष्टी, साळी, पटवेकर, । बावन्न[8] वर्णे पातले.॥५॥ पादवक्षग्रीवाहीन । करूनि[9] सांडिला छिन्नभिन्न । ऐसीयातें वधिल कोण ? । बळसंपन्न कीचकू. ॥ ६ ॥ वृद्ध वृद्ध बोलती वचनीं, । 'न कळे ईश्वराची करणी, । कांहीं वदों नये वचनीं, । चोज[10] नयनीं देखिजे. ॥ ७ ॥ विराट पावला पुत्रासहित, । प्रधान सेनेसीं[11] समस्त, । सुदेष्णा आली शोक करित । पाहे प्रेत बंधूचें. ॥ ८ ॥ 'प्राण वेंचोनियां निर्फळें[12] । विराट केला निर्बळ, । आतां पृथ्वीचे भूपाळ । राज्य घेतील आमुचें. ॥ ९ ॥ कीचकबळाच्या सामर्थ्यें । राजे धाकती[13] सभोंवते, । आतां पीडिती आमुतें । राज्य घेतील सर्वेही.[14]' ॥ १० ॥ कीचकाचिया बहुत अंगना । करीत पातल्या शोकरुदना, । प्रेत वेष्टूनियां जाणा । हृदय हातें पीटिती. ॥ ११ ॥ पांचा आगळे एकशत[15] । कीचकबंधू बळसमर्थ । त्यांतें विराट आज्ञा करीत । प्रेतसंस्कार करावया. ॥ १२ ॥ प्रेत चालविलें स्मशानीं । बंधू प्रवर्तले दीर्घ रूदनीं, । म्हणती, 'राया ! आम्हां लागुनी । आज्ञा दीधली पाहिजे. ॥ १३ ॥ सैरंध्रीयें[16] घेतला प्राण । तीचें करूं देह दहन, । पावकीं घालूं बांधून । जेंवी नारळ होळिके.[17] ॥ १४ ॥ राजा म्हणे, 'गंधर्व येती । त्यांतें आवरावया

---

१. वर्तमान. २. कामेच्छा तृप्त करण्यासाठीं. ३. 'टाकिला' असाही पाठ आहे. ४. उत्तरकार्य. 'पुढील' हा पाठ आढळतो तोच चांगला आहे. ५. समुदाय. ६. मावेना. ७. कोष्टयांचीच एक जात. ८. मुक्तेश्वराच्या वेळेला बावन्न जाती होत्या म्हणून हा आंकडा आला कीं काय ? ९. 'कुक्कुटसांटि(?) छिन्न भिन्न' असा पाठ आहे. 'कोंबड्यासारखा' असा अर्थ होईल; पण 'सांटि' म्हणजे काय ? १०. चमत्कार. 'तुका म्हणे उगी रहावें । जें जें होइल तें तें पहावें ॥.' ११. सेनेसह. १२. फुकट, विनाकारण. हा सुदेष्णेचा शोक आहे. १३. भितात. १४. सगळा हा स्वार्थपर शोक आहे. 'माझें कसें होईल' हा बहुतेक शोकाचा तात्पर्यार्थ ! १५. एकशें पांच. १६. सैरंध्रीसाठीं हा मरण पावला. १७. पंतांनीं हा प्रसंग विशेष खुलविला आहे. विराटपर्व—अ० १ ला पहा.

शक्तीं । अंगीं असेल, तरी हे रीती । विचारुनी वर्तावें.॥१५॥ बंधूचिया संगती जाणा । जाणे नलगे[1] यमसदना, । ऐसें कीजे विचक्षणा[2] । दीर्घदृष्टी विलोकें.'॥१६॥ ते म्हणती, 'जी! नरपार्थिवा! । गंधर्वांचा कितुला केवा[3]? । युद्धा पातल्या मघवा[4] । शिक्षा करूं प्रतापें.' ॥ १७ ॥ द्रौपदी कवळूनियां हस्तकें । चालविली रुद्रभूमिके[5]. । येरी प्रलापोनि[6], दुःखें । सर्व लोकां जाणवी. ॥ १८ ॥ '[7]जय, जयंत, विजयनामा, । जयत्सेन, जयद्वल सुकर्मा, । या पांचांच्याही पराक्रमा । दुजी उपमा असेना. ॥ १९ ॥ पांचही गंधर्व बळसमर्थ । असती या देहाचे प्राणनाथ, । तयांतें जाणवावा वृत्तांत । भार्या तुमची नेली दुरात्मीं. ॥ २० ॥ बांधोनि होमिती पावका[9] । हा अन्याय असावा ठाउका.' । ऐसें जाणवितां लोकां । पांचांतेंही जाणवलें. ॥ २१ ॥ मग भीमसेन राहोनि गुप्त । हाक मारी गगनाआंत[10], । '[11]यांपासूनि भयाचा वृत्तांत[12] । तूतें न लागे सर्वथा. ॥ २२ ॥ स्वस्थ होवोनि अंतःकरणीं । होईल तें विलोकीं नयनीं.' । येणें[13] बोलें याज्ञसेनी । स्वस्थचित्तें राहिली. ॥ २३ ॥ आडमार्गें उडोनि भिंती[14] । भीम पातला गुप्तगती । कोणा न कळतां महामती[15] । सिद्ध पुरुष पैं[16] जैसा. ॥ २४ ॥ रुद्रभूमिके तळवटीं । शमीवृक्षांची महादाटी । तेथूनि प्रकटला जगजेठी । [17]गंधर्वरूपा अवगला[18]. ॥ २५ ॥ [19]तालप्रमाण विशाल दारु[20] । हातीं प्रचंड तरुवरु । देखोनि कीचकसहोदरु । म्हणती, 'गंधर्व पातला!' ॥ २६ ॥ शंख [21]करिती दोनी हातें । पळों लागले नगरपंथें, । भीमें धांवोनि मागुतें ।

---

१. लागणार नाहीं. २. काळजीपूर्वक शोध, विचार. ३. प्रतिष्ठा. ४. इंद्र. पुष्कळ यज्ञ करून ब्राह्मणांस संतुष्ट करणारा, महासामर्थ्यशील इंद्र. ५. स्मशानीं. हें शंकराचें स्थान. अंत करण्याचें काम रुद्राचें आहे. ६. शोक करून. एक गोष्ट विनसली म्हणजे संकटांची राशी पाठीमागें लागते. 'छिद्रेष्वनर्था बहुलीभवंति.' ७. खालील वाक्यें लोकांस उद्देशून आहेत, पण धर्मभीमांस कळवावें हा अंतस्थ हेतु होय. ८. हीं धर्मभीमार्जुननकुळसहदेवांचीही पण नामे होत. गंधर्वांचींही हीं नांवें आहेत. ९. अग्नीला अर्पण करितात. १०. पाकशाळेंतूनच ही हाक त्यानें मारिली असावी. ११. या संकटापासून. १२. वात (वारा). हा पाठ चांगला दिसतो. १३. या बोलानें, आश्वासनानें. १४. नगराचा तट. १५. भीमाचें विशेषण. 'महामूर्ती' हाही पाठ आहे. १६. हा 'वै'चा तर अपभ्रंश नव्हे? पैं=खरोखर. १७. गंधर्वांचा वेष. १८. घेतलें. १९. ताडाइतका उंच. २०. 'विशाल कर' (महाबाहु) हाच चांगला पाठ आहे. २१. ही शोकसूचक चाल केव्हां पडली असावी? पूर्वीं युद्धांत उत्साहस्फूर्तीसाठीं शंख वाजवीत. भयानक रस आहे.

वळोनि बळें आणिले. ॥ २७ ॥ बळें ताडितां[1] वृक्षपात । एक एक झाले प्रेत, । पांचा आगळे एकशत । **कीचकबंधू** मारिले. ॥२८॥ कोणीं न देखतां डोळां । बल्लव प्रवेशला पाकशाळा, । वृत्तांत जाणवला भूपाळा । **कीचकबंधू** निमाले. ॥२९॥ राजा हस्तें पिटोनि भाळा[2] । म्हणे, 'अद्भुत देखिलें डोळां । निरोपोनि मंत्रियां सकळां । प्रेतें दहन करविलीं. ॥३०॥ शतवारी[3] एकशत । भक्षूनि तोषविला पावक । **याज्ञसेनी** प्रसन्नमुख[4] । राजसदना पातली. ॥ ३१ ॥ **सुदेष्णा** म्हणे **सैरंध्रीतें**, । 'तुझें चरित्र नकळे मातें । काय विचित्र वर्तलें येथें ? । तुझेनि योगें कळेना. ॥ ३२ ॥ काल रात्री तुझेनि गुणें[5] । नगरीं उठलीं नानाविघ्नें, । **कीचका**सारिखा गेला प्राणें । बंधूसहित तुंजलागीं[6]. ॥ ३३ ॥ आतां राहूं नको येथें, । जायीं आणिका नगरातें.' । येरी हासोनि म्हणे तियेतें[7], । 'होणार तैसें घडेल. ॥ ३४ ॥ बहुत काळ पैं लोटले, । स्वल्प शेष कांहीं उरले, । तूतें धीर न धरवे वहिला । तरी जायीन तत्काळ.' ॥ ३५ ॥ **कृष्णा** येऊनि नृत्यशाळे । वृत्तांत सांगे **बृहन्नळे**. । ते म्हणे, 'वो **पांचाळबाळे**[8] ! । चिंता कांहीं न करावी.' ॥ ३६ ॥ **बृहन्नळा** म्हणे वचनीं, । 'उत्तरे ! माझे वरशिष्यिणी ! । **सैरंध्रीतें** संरक्षणीं । सादर तुवां असावें. ॥ ३७ ॥ तुझी जननी उदासवचनी[9] । बोलोनि दवडी आणिका स्थानीं; । तुवां बोधोनि, तियेच्या मनीं । प्रीती उपजे तें करीं. ॥ ३८ ॥ इतुकी देईं गुरुदक्षणा.' । उत्तरा नमस्कारी चरणा. । म्हणे, 'ये विषयीं मना । उद्विग्नता[10] नाणावी'. ॥ ३९ ॥ उत्तरा म्हणे जननीलागीं, । 'वर्जिल्या[11] वर्तें जो कुमार्गीं । तो प्राणी अविचारसंगीं[12] । नाश पावतो कुकर्में. ॥ ४० ॥ **कीचकें** करितां हा अपराधू । कोण्ही न कराचि निषेधू, । पापकर्में पावला वधू । दुष्ट, कपटी, दुरात्मा. ॥ ४१ ॥ तो अपराध ठेवोनि शिरीं । ईतें घालिसी बाहेरी, । तुमच्या विवेकाची कुसरी[13] । वेदीं शास्त्रीं नाढळे. ॥४२॥

---

१. 'घालितां' असाही पाठ आहे. 'वज्रघाता'पेक्षां 'वृक्षघात'च चांगला पाठ. २. 'प्राणरहित पसरले' असा पाठ आहे. कपाळ पिटणें=नशीबाच्या नांवानें रडणें. ३. 'शतावरी षष्ट एक' असा पाठ कोणत्याही प्रतींत नाहीं; पण अर्थास तर तो अवश्य हवा आहे. ४. द्रौपदीस आनंद झालाच असेल. पण तो या प्रसंगीं दाखविणें हें सामान्य जनाप्रमाणें वर्तन झालें. ५. पायगुणानें ? ६. तुझ्यामुळें. हा द्रौपदीवर झाडलेला ताशेरा किती अन्यायमूलक आहे. मुळांत सुदेष्णेला असें म्हणायला विराटानें सांगितलें आहे. ७. तिला. ८. अशी कशी हांक मारिली. ९. विरक्तीच्या बोलण्यानें. १०. काळजी. ११. निषिद्ध. १२. अविचार केला म्हणून. १३. शहाणपणाची चतुराई.

स्वल्प काळ लोटलिया । सहज जातील आपुल्या ठाया, । तुवां बोलोनियां वायां[1] । अपकीर्ती माथां न घेणें. ॥ ४३ ॥ तीतें वदाल दुष्टवचन । तरी मी त्यजीन आपुला प्राण, । आणीक असेल कारण । तें जाणवेल पुढारें[2]. ॥ ४४ ॥ पांचां गंधर्वांची वनितां । हेळसूनी[3] अपमान करितां[4] । तात्काळ पावाल अनर्था। हें निर्धारें जाण पां. ॥ ४५ ॥ पश्चात्तापें हृदय फुटे, । आपुला[5] अन्याय आपणा न वाटे, । ऐसें कर्म विचारनिष्ठें[6] । नाचरावें सर्वथा.' ॥ ४६ ॥ ऐसें सांगोनि सुदेष्णेतें । दुंणाविलें[7] प्रीतीभावातें, । सन्मानिलें सैरंध्रीतें । धनें वसनें सुशब्दीं[8]. ॥४७॥ बृहन्नळा म्हणे, 'कुमारी ! । बुडविलें[9] उपकारसागरीं.' । येरी[10] म्हणे, 'स्तव न करीं; । मी किंकरी निर्धारें.' ॥४८॥ संगीत नृत्य कळाकुसरी । पार्थ सिकवी स्नेहांदरीं[11] । झाली शारदेचिये सरी[12] । विद्याधरी[13] निपुणत्वें. ॥ ४९ ॥ प्रार्थूनियां मागे वरू, । 'मातें कोण प्राणेश्वरू ?' । 'कृष्णभगिनी सुभद्राकुमरू । अभिमन्यु तूतें वरील. ॥ ५० ॥ परिक्षिन्नामा जन्मेल पुत्र । विवेकें[14] विचारें सुपवित्र । कळीतें[15] दवडूनि, स्वतंत्र[16] । संरक्षील धर्मातें. ॥ ५१ ॥ विष्णुचरित्र भागवत निकें । विस्तारील श्रीशुकमुखें । त्याची कीर्ती तुळितां न तुके । पुण्यश्लोकामस्तकीं[17]. ॥ ५२ ॥ येतील आमुच्या[18] संबंधा । अन्यथा नाहीं या

---

१. व्यर्थ रागाऊन, बोलून. किंवा रागाऊन व्यर्थ अपकीर्ति करून घेऊं नको. २. पांडवांबद्दल उत्तरेच्या मनांत कांहीं संशय आला होता कीं काय? हा उत्तरेच्या त्राग्याचा विषय मूळ भारतांत नाहीं. ३. 'हेला' (तिरस्कार करणें) यापासून झाला. 'हेलसांड करणें' हा हल्लींचा शब्द आहेच. ४. तुम्ही करीत असतां, केलात तर. ५. हें उत्तरेचें बोलणें आपल्या लक्ष्यांत राहील तर काय होणार नाहीं? ६. विचारवंतानें. ७. दुप्पट केलें. ८. गोड शब्दांनीं. ९. उपकारसमुद्रांत नेऊन दडपिलें, अत्यंत उपकार झाले. ही कृतज्ञता व तिचें प्रदर्शन योग्यच होय. १०. उत्तरा. ११. प्रीति आणि कळकळ या दोन्हींनीं. शिक्षकांनीं इकडे लक्ष्य द्यावें. १२. बरोबरीची. १३. श्रेष्ठ प्राण्यांतील स्त्री. 'विद्याधराप्सरोयक्षरक्षोगंधर्वकिन्नराः' इत्यमरः. १४. तारतम्यज्ञान, Reason. विचार, Understanding. सुपवित्र=पुण्यश्लोक, Holy. १५. पापपुरुषाला. १६. मनानें पवित्र, विकारशून्य असा. १७. पुण्यश्लोक पुरुषांच्या मस्तकावर सुद्धां जन्मेजयाची कीर्ति राहूं शकणार नाहीं, त्याच्या कीर्तीला जोडाच मिळणार नाहीं. निरुपम **उपमा** आहे. १८. बृहन्नळेचें हें बोलणें फार भोळेपणाचें दिसेल. उत्तरेजवळ परोक्षरीतीनें कां होईना, पण येवढें गुह्य सांगणें अप्रशस्तासारखें दिसेल. पण उत्तरेला खरी हकीकत कांहीं तरी समजली होती अशी मुक्तेश्वराची समजूत दिसते. ४४ व ४८ ओव्या पहा. किंवा बृहन्नला पुनः धर्माच्या सेवेंत पांडव प्रगट झाल्यावर जाणार असें उत्तरेस कळविलें असल्यास अर्थातच संबंध कायमच राहणार.

६ मु० म० वि०

शब्दा.' । दोघीं पावोनि [1]संबंधा । [2]सुखसंवादा वर्तती. ॥ ९३ ॥ मुक्तेश्वराच्या कवित्वप्रबंधें । श्रोतयां श्रवणीं निघती दोंधें(?) । लीलाविश्वंभरप्रसादें । मुक्तता होय [3]शुक वक्ता. ॥ ९४ ॥ इति श्रीविराटपर्वं भारत । कीचकअनुजांचा निःपात । जाहल्यानंतर कौरवदूत । पांडव शोधा लागती. ॥ ९५ ॥

---

## अध्याय पांचवा.

विराटनगरीं [4]वळाथिला । पंचगंधर्वीं मारिला । हें ऐकोनि [5]राजयांला । संतोष आणि संशय. ॥ १ ॥ कीचकबळें मत्स्यनरेश । नित्य [6]साधी नूतन देश । करभार आणवितां त्रास । भूपाळांतें देतसे. ॥ २ ॥ हृदयकंटक [7]उन्मळला, । महाउपद्रव [8]खंडला, । या कारणें संतोषला । राजसमूह [9]बहुदेशीं. ॥ ३ ॥ स्वर्गीचे गंधर्व पातले तेथें । घात केला कीचकातें । हें [10]अघटीत; वसती तेथें । गुप्त पांडववीर [11]ते. ॥ ४ ॥ हस्तनापुरा कौरवनाथा । [12]वार्तीक जाणविती वार्ता, । 'विराटनगरीं अत्यद्भुता, । रात्रीं कीचक मारिला. ॥ ५ ॥ कोणे वधिला हें नेणवें.' । म्हणती दुसरे, '[13]नि गंधर्वें; । चतुरीं जाणोनि, [14]जाणावें; । तरीच हें कळेल निश्चयें.' ॥ ६ ॥ कौरव मिळोनि एके ठायीं । चिंताज्वरें व्यापिले हृदयीं । म्हणती, 'आतां करणें [15]कांहीं? । हे सर्वेही [16]विचारा. ॥ ७ ॥ भीष्म, द्रोण, कर्ण, शकुनी, । कृप, [17]बाल्हीक, विकर्ण, द्रोणी, । दुःशासनादिक बंधुश्रेणी । सभास्थानीं [18]मिळाले. ॥ ८ ॥ 'अज्ञातवास क्रमिला [19]बहुत । कोठें नुमगती पंडुसुत । हाही आमुतें अनर्थ । समीप आला दिसतसे. ॥ ९ ॥

---

१. उत्कर्षा. 'आनंदा' असा दुसरा पाठ आहे. २. हितगुजाच्या गोष्टींला. ३. 'सुखवक्ता' व 'श्रोतयां' हे पाठ आहेत. शेवटचा बरा. ४. बळानें उन्मत्त झालेला कीचक. ५. सर्व राजे लोकांस. 'कौरवांला' व 'राजेश्वराला' असेही पाठ आहेत. आदर्श पुस्तकांतील पाठ चांगला आहे. कारण खालींच दिलें आहे. ६. हा मराठेशाहींतला शब्द. 'राज्य साधणें' हा प्रयोग त्यावेळीं सर्वांस अवगत होता. ७. उपटून बाहेर टाकला. हृदयकंटक=हृदयशल्य. ८. अदृश्य, नष्ट झाला. ९. 'बहुसाल' असाही पाठ आहे. १०. न होण्यासारखें, अद्भुत. हा राज्याचा संशय होय. ११. 'नसती कीं?' हा पाठ चांगला. संशय दाखवावयाचा आहे. १२. बातमीदार. १३. खरोखर. १४. 'जावें' हा चांगला पाठ उपलब्ध आहे. १५. काय कारणें तें. १६. विचार करा. १७. बाल्हीक देशचा राजा. विकर्ण=दुर्योधनाचा भाऊ. द्रोणी=अश्वत्थामा. १८. 'मीनले' असा बाकीच्या तीन प्रतींतील पाठ आहे. १९. बराच भाग क्रमण झाला, गेला. हें दुर्योधनाचें बोलणं आहे.

चार प्रेरिले असंख्यात । पृथ्वी शोधावी समस्त । पांडव कळलिया पुरुषार्थ । चारी[1] आम्हीं साधिले. ॥ १० ॥ छपन्न देश, पुर, पट्टणें[2] । नाना पर्वत, नाना वनें, । जेथें वसिजे तपोधनें । तीं तीं स्थानें शोधावीं. ॥ ११ ॥ द्वीपें[3], खंडें[4], समुद्रतटें । गंगायमुनावाळवंटें । गुहा, गव्हरें, गिरीकपाटें, । मध्यवेटें[5] शोधावीं. ॥ १२ ॥ जेथें होतीं हरिकीर्तनें । हरिहरपुराणश्रवणें । घोष गर्जती विष्णुस्मरणें । तीं तीं स्थानें पहावीं. ॥ १३ ॥ आचारशीळ, धर्मशीळ, । जेथें वसती भूतदयाळ[6] । जेथें सत्वनिष्ठांचा[7] मेळ । तें तें स्थळ शोधावें. ॥ १४ ॥ पतिव्रतांचिये मेळीं । शोधोनि पाहावी पांचाळी । संतसज्जनाची मंडळी । तेथें वास्तव्य धर्माचें. ॥ १५ ॥ चहूं वेदांचें पारायण । जेथें वेदशास्त्रश्रवण । उ[8]पनिषदांचें व्याख्यान । तें तें स्थान धर्माचें. ॥ १६ ॥ जेथें वसती दयावंत । सत्यवादी धर्मीं निरत । ते ते ठाईं सावचित्त । पंडुसुत शोधावे[9]. ॥ १७ ॥ पंचशत[10] कोटी विस्तीर्ण मही । शोधूनि चार पातले पाहीं । म्हणती, 'पांडवांची कांहीं । वार्ता तेही[11] लाधेना.' ॥ १८ ॥ दुर्योधन, दुःशासन । म्हणती, 'पांडव पावले निधन[12], । यया बोला नाहीं आन[13] । संशयीं मन न घालावें. ॥ १९ ॥ जरीं जीवें[14] ते असते । तरी कोठेंही चोजवते[15] । अद्भुतकरणीस्तव पावते । प्रसिद्धता लौकिकीं. ॥ २० ॥ भीष्म म्हणे, 'ऐका खुण, । जेथें वसती पवित्र जन । तो देश पुण्यपावन, । दुःख दुश्चिन्ह असेना. ॥ २१ ॥ मेघ वर्षती इंच्छिले[16] काळीं, । पत्रीं[17] पुष्पीं सदा फळीं । औषधी प्रसवती भूतळीं; । पशु-

---

१. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ आहेत. २. व्यापाराचीं शहरें. ३. सात द्वीपें. ४. 'नऊ खंड पृथ्वी नि दहावें खंड काशी' हें वाक्य आबालवृद्धांस माहित आहे. ५. हिंदुमहासागरांतील कीं सगळ्या समुद्रांमधील? ६. अनाथांचे कैवारी. ७. सात्विकवृत्तीच्या लोकांचा; साधुपुरुषांचा. दुर्योधनाची ही शिफारस पाहून पांडवांनीं आपल्यास कां धन्य मानून घेऊं नये? ८. यांत ज्ञानाची मीमांसा आहे. ९. या सगळ्या आज्ञा बातमीदारांस दिलेल्या होत्या व त्याच कौरवराज पुनः सभेमध्यें सांगत आहे. १०. हल्लींच्या हिशेबानें पांच कोटी मैल क्षेत्रफळ येतें. ११. सुद्धां. १२. मरण. १३. दुसरें बोलणें नाहीं, संशय नाहीं. १४. जिवंत, जीवासह. १५. कळले असते. ज्ञानदेवाच्या कवितेंतच याअर्थीं हा शब्द आढळतो. हल्लीं 'कौतुक करणें, आश्चर्य करणें' असा अर्थ झाला आहे. 'चुच' (आश्चर्य) या शब्दापासून झाला. १६. ज्या वेळीं पाहिजे त्या वेळीं. हिंदुस्थानांत मेघांचें माहात्म्य फार आहे. पाऊस पडला तर आमच्यासारखे भाग्यवान् कोणीच नाहींत. १७. वृक्ष नेहमीं पानें, फुलें व फळें यांनीं संपन्न असतात.

पक्षी सुखरूप. ॥ २२ ॥ सर्व धान्य सर्व शाखा, । [1]वोहट नव्हे नद्योदका, । धेनू महिषी अजादिका । क्षीरवृद्धी आगळी. ॥ २३ ॥ असंख्य ब्राह्मणभोजनें । जेथें संतोष पावती [2]दीनें । [3]तेथें पांडवांचें वसणें । ऐसें शहाणे बोलती. ॥२४॥ संतसज्जनाचे संगती । पांडव राहती करूनि वस्ती । ते ते स्थळीं बुद्धिवंतीं । शोधूनियां पाहावे.' ॥ २५ ॥ ऐकोनि बोले आचार्य द्रोण, । 'जेथें हरिहरस्मरण, । जेथें वासुदेवाचें भजन । तेथें विघ्न असेना. ॥ २६ ॥ [4]व्योमकेश, [5]हृषीकेश, । स्मरतां नाहीं ज्या [6]अवकाश । मरण न शिवे त्याचा देश । सुख संतोष त्या ठाई. ॥ २७ ॥ पांडव पावले नाहीं मरण । [7]असती तेथें सुखसंपन्न, । दिवस [8]मर्यादा होतां पूर्ण । [9]प्रघट होती स्वभावें.' ॥ २८ ॥ कर्ण म्हणे, 'ऐसें नव्हे, । [10]अपूर्णदिवसांमाजी शोधावे, । [11]नेसीं गोऊनि सोडावे । अरण्यवासा मागुतीं. ॥ २९ ॥ [12]उडगण(?) चढों जाय भिंती, । तृणें लोटितां पडे पुढती, । पंडुपुत्र ऐसिया युक्ती । दुःखार्णवीं लोटावे.' ॥ ३० ॥ [13]गौतमी बोले, 'ऐका सकळ, । [14]संकल्प करां तितुका निर्फळ, । ईश्वरइच्छेचा विचित्र खेळ । [15]मौन्यंदृष्टीं पहावा. ॥ ३१ ॥ इच्छावें तें सहसा न घडे, । न [16]घडावें तें अंगा जडे, । कर्मभोगाचें [17]कुंवाडें । कोणा नुगवे सर्वथा.' ॥ ३२ ॥ अश्वत्थामा म्हणे, '[18]निरुतें । गुप्तदिवस लोटतां पुरते । शब्द न लागे आपणातें । ऐसे पांडव वर्तती. ॥ ३३ ॥ प्रकट झालिया सुनेमीं । [19]मैत्री अथवा विरोध धर्मी । आवडे

---

१. सुकती. 'ओहट' हा मूळ शब्द. 'अवअटन' (खालीं जाणें) हा संस्कृत शब्द होय. २. 'जनें' 'मनें' असे पाठ आहेत. ३. संतांच्या समागमाचा महिमा भीष्मांनीं योग्य सांगितला. ४. आकाशाच्या रंगाचे, निळे आहेत केश ज्यांचे असे शंकर. ५. इंद्रियांचा स्वामी. (विष्णु.) ६. स्मरण केल्यावांचून रिकामा वेळ जात नाहीं. ७. जेथें असतील तेथें सुखांत असतील. काय भीष्मद्रोणांचें पांडवांवर प्रेम हें! 'मेले असतील' हें त्यांस म्हणणें खपलें नाहीं! ८. अज्ञातवासाच्या दिवसांची. ९. 'प्रगट' 'प्रकट' हे मूळचें रूप. १०. वरील दिवस संपले नाहींत तोंच. ११. ठरविलेल्या अटींत पुनः गुंतवून. १२. गोगलगाय? १३. गौतमकुलोत्पन्न कृपाचार्य. १४. 'मनसा चिंतितं कार्यं दैवमन्यत्तु चिंतयेत्.' Man proposes and God disposes. १५. 'मौन' हा मूळ शब्द. गप्प बसून. १६. It is the unexpected that always happens! १७. चमत्कार. 'कुवेडें' हा शब्द वायकांस ठाऊक असतो. 'कोडें' हा मूळचा शब्द. नुगवे=न सुटे. १८. खरोखर. 'निरुक्त'पासून झाला? लोटतां=लोटावयाचें असतां. १९. मैत्रीधर्म=Religion of amity. विरोधधर्म=Religion of enmity.

तैसें वर्ता तुम्हीं । प्रस्तुत विचार कायसा?' ॥ ३४ ॥ सु[1]शर्मा त्रिगर्ताधिपती । म्हणे, 'न मानें ह्या यु[2]क्ती, । पांडव विराटपुरीं वसती । संशय यदर्थी असेना. ॥ ३५ ॥ जीमूती जेठियांचा रँ[3]गडा, । मारिला बळिष्ठ कीचक गाँ[4]ढा, । पां-डवांवीण हा पँ[5]वाडा । कोण कर्ता भूतळीं? ॥ ३६ ॥ कैंचा बल्लव? कैंचा कंक? । कैंचा तंतिपाळ? नामा ग्रंथिक? । नामें पालटूनियां देख । अज्ञात-वास लो[6]टिती. ॥ ३७ ॥ जे का बोलती सैरंध्री । रँ[7]जांगनेची सेवा करी । ते होय द्रुपदाची कुमरी । याँ[8]ज्ञसेनी बोलिजे. ॥ ३८ ॥ द्विभाग करूनियां सेनें । व्यापिजे उत्तर आणि दक्षिणे, । विराटरायाचीं गोधनें । बळात्कारें हरावीं. ॥ ३९ ॥ तेथें सहज मातेल कळी । जाणोनि येतील महाबळी, । तुमचा सं-कल्प वि[9]कल्प फळीं । फळे ऐसें करावें. ॥ ४० ॥ गाई ब्रा[10]ह्मण पीडितां वेगें । पांडव सहसा न राहती उगे, । अं[11]वघ्यापुढें लो[12]गवेगें । संग्रामातें मिसळती.' ॥ ४१ ॥ ऐकोनि अल्हाद दुर्योधना । शकुनी, कर्ण, दुःशासना, । सैनिकातें देवोनि आज्ञा । प्र[13]स्थानभेरी ठोकिल्या. ॥ ४२ ॥ विचित्ररंगी व[14]स्त्रागारें । उभविलीं दे[15]वगंगेच्या तीरें, । आपुलेनि द[16]ळभारें । महावीर निघाले. ॥ ४३ ॥ ह[17]स्ती, घोडे, रथ, पदाती, । अनेक शस्त्रें धरिलीं हातीं । सुवर्णकवचाचिया दीप्ती । भा[18]नुकिरणें लोपती. ॥ ४४ ॥ शूळधर खड्गधर, । फरश पट्टीश तोमरधर, । तु[19]ळवे ल[20]हुडी चक्रधर । शतसहस्र निघाले. ॥ ४५ ॥ तडक(?) यंत्रबाण बाणे । कटारे दु[21]धारे झे[22]णाणें । दे[23]शघ्नी शतघ्नी स[24]त्राणे । करसाधनें दाविती.

---

१. संशप्तक राजा. २. विचार. ३. मल्लांस जिंकणारा. ४. 'होडा' असाही पाठ आहे. हा 'हुडा' (बुरुज) या पासून झाला. ५. स्तुतीस योग्य असें कृत्य. पोंवाडा, पंवाडा हें पोंवा, पं-वया वाजविण्याच्या आयुधावरून निघाले. ६. 'पांडव' हा कर्ता. ७. इतर प्रतींत हा चरण तिसरा आहे. 'भासे शचीचिया परी' असा दुसरा चरण आहे. येथील तिसरा चरण नसून चवथ्यांत 'ते द्रौपदी जाणावी' असा पाठ आहे. ८. यज्ञापासून उत्पन्न झाली ती द्रुपदकुमारी द्रौपदी. ९. संशय. संकल्प=कल्पना. 'संकल्पवल्ली सुफळी' असा चांगला पाठ इतरत्र आढळतो. १०. गोब्राह्मण संरक्षकांस ही शिफारस काय लहान आहे? ११. विनीवर. हा सुशर्मा त्या दुष्ट चौकडीमध्यें शहाणा दिसतो. शकुनिमामा गप कां बसले कोण जाणे? १२. झटपट. १३. निघण्याचा डंका वाजविला. १४. तंबु, कापडघरें. १५. भागीरथी? १६. सैन्याचीं पथकें. १७. ही चतुरंग सेना. १८. **व्यतिरेक** आहे. १९. त्रिशूळ? २०. हें काय हत्यार आहे समजत नाहीं. २१. दोन धारांचें हत्यार. २२. 'झेपाणें' गोफण. २३. दहा माणसें मारणारी. २४. जोरानें.

॥ ४६ ॥ दुर्योधन आज्ञा करित, । 'सुशर्मा! तुवां त्रिगर्ता सहित । दक्षणे [1]माजील असंख्यात । विराटगाई वो(व ?)ळाव्या. ॥ ४७ ॥ [2]झुंझा गोविजे विराटराजु । तंव आम्हीं येतसों उत्तरे [3]उंजु, । युद्धें झालिया निस्तेजु, । शरण येईल आमुतें. ॥ ४८ ॥ हेम, रत्नें, कुंजर, धेनू । [4]हिरूनी करूं पामर दीनू, । जैसी प्रभा लोपी भानू । घनमंडळ उदेलिया. ॥ ४९ ॥ वृक्षसहित श्वापदमेळु । काननी भस्म करील [5]अनळु, । तैसीं विराट आणि कुंतीबाळु । निवडूनि सांडूं संग्रामीं. ॥ ५० ॥ जैसा पारधी एकजाळीं । असंख्य मीनें एकला गिळी, । सपुत्र विराट पांडवबळी । नाहीं करूं एकदां.' ॥ ५१ ॥ कौरवरायाचिये आज्ञे । त्रिगर्त पातला दक्षणे, । काठीकर राऊत राणे । धाविन्नले [6]चौमेळीं. ॥ ५२ ॥ सुशर्मा [7]त्रिगर्ताधिपू । लक्षसंख्या धेनूकळपू । वळोनियां जाणवी प्रतापू । भेरीनादें आगळा. ॥ ५३ ॥ गाई वळोनियां निगुती । [8]कुंजरपुराचिये पंथीं । सहस्र राजदूतांचिये हातीं । चालविल्या निजबळें. ॥ ५४ ॥ कामधेनूची संतती । नाना वर्ण विचित्राकृती । कर्पूर केतकीची दीप्ती । घमघमिती परिमळें. ॥ ५५ ॥ पुच्छें शोभती जैसीं [9]चामरें । माथां वाहिलीं मनोहरें, । [10]दोहीं दाटल्या [11]पयोधरें । मार्ग सारा शिंपिती. ॥ ५६ ॥ धेनु वळोनि पुरुषार्थी । वाद्यें वाजविलीं त्रिगर्तीं, । असंख्य गोपाळांच्या पंक्ती । करबंधनीं कर्षिल्या. ॥ ५७ ॥ [12]जोडी कांबळी रहितवस्त्रीं । [13]पृष्ठीं ताडिल्या [14]कौष्ठिकायंत्रीं, । पळतां [15]पांचजन्यमंत्रीं । विराटनगरीं पातले. ॥ ५८ ॥ म्हणती, 'येउनी परदळ । गाई वळविल्या सकळ, । कौरवपुरीचा भूपाळ । ऐसें श्रवणीं ऐकिलें.' ॥ ५९ ॥ गोरक्षकांच्या दीर्घ स्वरीं । हाक वाजली विराटनगरीं । [16]रांजा क्षोभला, झुंझारीं । वीर भारीं सज्जला. ॥ ६० ॥ सेनापती प्रधान मंत्री । सोइरे सेवक महाक्षत्री । सिद्ध झाले शस्त्रास्त्रीं । [17]रणंचत्वरीं भिडावया. ॥ ६१ ॥ आमुच्या खड्गाचिया मुष्टीं । मर्दूं कौरवांचिया [18]थाटी । त्रिगर्तातें भूतळवटीं । पाताळगर्ता दाखवूं. ॥ ६२ ॥ आठ सहस्र [19]रहंवर । साठ सहस्र अश्वस्वार ।

---

१. मधल्यामधील. २. युद्धाला गुंतीव. ३. सरळ. Straight. ४. हरण करून. विराटाला दीन आणि मूर्ख करूं. पामर=दुर्दैवी! ५. अग्नी. ६. 'चौफेरीं' पाठांतर. ७. त्रिगर्तदेशचा राजा. ८. हस्तिनापुर. ९. चवऱ्या. १०. दूध काढण्याला. ११. दुधानें भरलेल्या स्तनांनीं युक्त. १२. 'जाळी' असा पाठ आहे. १३. 'वस्त्रीं,' पृष्ठीं, ही साहित्यार्थीं तृतीया. १४. काठ्यांनीं. १५. शंखध्वनि करीत, ओरडत. १६. विराट. १७. रणभूमीवर. चत्वर (चौक). १८. जमाव. १९. रथ.

एक लक्ष नर [1]झुंझार। वीर [2]वोटीव पाईचे. ॥ ६३ ॥ [3]शाव्यायन [4]भद्रजाती। पांच सहस्र पर्वताकृती । पांच पांच [5]महावंतीं । पताका दंड कवळिले. ॥ ६४ ॥ पुढें [6]कुंजराचे थाट, । पाठी तुरंग घनदाट, । रहंवरांचे घडघडाट, । वीर [7]उद्भट पायांचे. ॥ ६५ ॥ लागलिया [8]निशाण भेरी, । [9]शृंगें काहळ [10]रणमोहरी, । [11]दुंदुभीच्या महागजरीं । नाद [12]अंबरीं न [13]समाये. ॥ ६६ ॥ कंक बोले महींद्रातें, । 'रहंवर एक ओपिजे मातें, । बल्लव आणि तंतीपाळातें । ग्रंथिकातें रथ एकु. ॥ ६७ ॥ तुझें भक्षिलें असे अन्न, । तें व्हावया उत्तीर्ण । इच्छा करी आमुचें मन । तें आजि दृष्टी दाखवूं.' ॥ ६८ ॥ रायें तोषोनि [14]अंतरीं । आरूढ केले रहंवरीं, । धनुष्यबाण वोपिले करीं । [15]वर्मे [16]चर्मे सुढाळें. ॥ ६९ ॥ विराटरायाचे पाठीं । चौघे चालिले जगजेठी. । म्हणती, 'राया! स्वल्प पोटीं । धैर्य धरीं बळिष्ठा! ॥ ७० ॥ विजय कवळूनियां मुष्टी, । आम्हीं [17]बांधिल्या तुझीये पाठी, । क़ाळिमा लावूनियां लल्लाटीं । कौरव जाती स्वस्थळा.' ॥ ७१ ॥ विराटसेना [18]सिंधोदक । अत्यद्भुत लोटतां देख, । त्रिगर्त पातला सन्मुख । घोर संग्राम माजला. ॥ ७२ ॥ नृत्यशाळे बृहन्नळा । म्हणे, 'कौतुक पडेल डोळां.' । उत्तरकुमर स्त्रियांजवळां । अंतःपुरीं राहिला. ॥ ७३ ॥ असो. दों भिन्न करूनि तेथें । सकळ गेले संग्रामातें, । मच्छदळा त्रिगर्तातें । युद्ध दारुण [20]मांडिलें. ॥ ७४ ॥ उभयदळीं बाणवृष्टी; । परस्परें भिडती [21]करंटी । राउत राउता पडे गांठी । शस्त्रें मुष्टी तोडिती. ॥ ७५ ॥ रथारूढ विराटनृपती, । सहस्र छत्रें उभविलीं वरुतीं । पताका पल्लवें वारिती । परदळातें फडफडां. ॥ ७६ ॥ 'गुप्त असती तेथें पांडव, । वैरियां होईल पराभव,' । ऐसा संकेताचा भाव । त्रिगर्तातें नेणवे. ॥ ७७ ॥ शूलधरांसीं शूलधर, । खड्गधरांसीं खड्गधर, । घाय हाणिती परस्पर । वाहती रुधिरें भडभडां. ॥ ७८ ॥ हस्त पाद तुटती घायीं, । शिरें तुटोनी पडती मही, । उदरें विदारूनि ठायीं ठायीं । प्रेतें [22]मही पसरलीं. ॥ ७९ ॥ विराटाचे सेनापती । पांचही आरुढोनी रथीं । बाणवृष्टी करितां हातीं । त्रिगर्तावरी उठावले.

१. योद्धे. २. निवडक. ३. मोठे दांडगे; साठमारीला योग्य? ४. हत्ती. ५. माहुतांनीं. ६. हत्तीचे. ७. दांडगे. ८. नौबत. ९. झांज. १०. सैन्याच्या पुढें. ११. मोठा नगारा. १२. आकाशांत. १३. मावे. १४. अंतःकरणीं. १५. कवच. १६. ढाली. १७. रक्षणाला असतां. १८. समुद्रप्रवाह. १९. विराटसैन्य. २०. झुंपलें. २१. हत्ती. 'किरीटी' असाही पाठ आहे. २२. पृथ्वीवर.

॥ ८० ॥ शतकुंजर सहस्र वारू । महारथी यांचा देखोनि मारू । सुशर्मा कोपला वैश्वानरू । धडके जैसा महावातें. ॥ ८१ ॥ लक्ष लावूनियां नयनीं । पांचही विंधिले विसां बाणीं । अश्व सारथी मारूनि धरणी । पांचहीजण पाडिले. ॥ ८२ ॥ हें देखोनि विराटराजू । धाविन्नला सुशर्मा-उजू; । जैसा कीं उन्मत्त गजू । कर्दळीवनीं माजला. ॥ ८३ ॥ विराटाचे बंधू दक्ष । सेनानी आणि मदिराक्ष । घेऊनि महावीरांचें लक्ष । युद्धकंदना मिसळले. ॥ ८४ ॥ बाणीं त्रासिलें कौरवदळ, । कुंजर खिळूनि केले अचळ, । महारथी मारूनि विकळ । अश्व बाणीं खोंचिले. ॥ ८५ ॥ सुशर्मा प्रचंड धनुर्धारी । विराट विंधिला एकशत शरीं, । अश्व सारथी मारूनि शिरीं । ध्वजस्तंभ छेदिला. ॥ ८६ ॥ अक्ष छेदूनि कडकडां । चक्रें उडविलीं दोहींकडां. । विराट म्हणे, 'न दिसे पुढां । उपाय कांहीं वांचावया.' ॥ ८७ ॥ सायक[1] विंधोनि घनदाट । विकळ पाडिला विराट, । अंगें धांवूनियां बळिष्ठ । दोहीं[2] बाहीं कवळिला. ॥ ८८ ॥ आणोनि घातला आपुले रथीं । चालिले हस्तनापुराप्रती, । दळें भयाभीतें पळती । विराटाचीं दशदिशा. ॥ ८९ ॥ पृष्ठभागीं बांधिले हस्त, । मोकळे केशीं विराटनाथ, । नेतां देखोनि अत्यद्भुत । हाहाःकार माजला. ॥ ९० ॥ ते वेळीं बोलिला धर्मराज, । 'भीमा ! दाखवीं आपुलें चोज[3] । विराट सोडवोनि पैज । जिंकोनि येईं बळिष्ठा !' ॥ ९१ ॥ नकुळसहदेवांतें म्हणे, । 'वेगीं करावें धांवणें । विराट सोडवोनी प्राणें । वांचविला पाहिजे. ॥ ९२ ॥ ईश्वरें दिधली बळशक्ती, । आश्चर्यीं होतों या संगती । त्याचें फळ ये आकांतीं । विराट आम्हीं रक्षावा. ॥ ९३ ॥ आम्हां देखतां अनुचित । होऊं नये गा ! सत्य सत्य, । आळस केलिया पुरुषार्थ । व्यर्थ गेला वीरहो ! ॥ ९४ ॥ उठा वैहिले[4] धांवा वेगीं । दूरी गेलिया कैष्टाल[5] अंगीं, । हस्तनापुरापर्यंत मार्गीं । पाठिलाग करावा. ॥ ९५ ॥ सोडवुनी नाणितां विराटराया । मागील जोडिलें गेलें वायां, । अपकीर्तिवंताची काया । प्रेतप्राय जाणावी.' ॥ ९६ ॥ सहदेव म्हणे, 'झुजतां रणीं । वोळखी पडेल तत्क्षणीं, । वैरी पीडितील व्यसनीं । तेरा वर्षें मागुतीं.' ॥ ९७ ॥ धर्म म्हणे, 'गा ! पुढारें । घडेल तें निर्वंडूं[6] विचारें. । आतां उठा धांवा त्वरें । विराट वेगीं सोडवा.' ॥ ९८ ॥ धर्मआज्ञेनें उतावीळ । तिघे पवनापरीस चपळ । धाविन्नले जैसे काळ ।

१. बाण. २. दोन्ही हातांनीं. ३. चमत्कार. ४. त्वरित. ५. दुःख पावाल. ६. दूर करूं.

ग्रासावया जगातें. ॥ ९९ ॥ म्हणती, 'सुशर्मा! राहें राहें, । मागें परतोनियां पाहें, । व्याघ्र पाठी लागला आहे । मेषा! पळसी केउता?' ॥ १०० ॥ पुढें धाविन्नले जगजेठी, । मागें धर्म येतसे पाठीं, । म्हणे, 'सुशर्मा दुष्ट कपटी । जित हातीं धरावा. ॥ १०१ ॥ सहसा न कीजे प्राणवधू, । प्रतिपाळावा माझा शब्दू, । जित धरूनियां विनोदू । विराटातें दावणें.' ॥ १०२ ॥ ठोकिलें त्रिगर्तांचें दळ । पारधीं सूदलें बाणजाळ । पुढें धांवोनियां नकुळें । गाई मागें फिरविल्या. ॥ १०३ ॥ ऐकूनि नकुळाची गर्जना । कौरवदूतीं सोडिलें प्राणा, । म्हणती, 'पंडूचिया नंदना- । ऐसा भासे कोण हा?' ॥ १०४ ॥ भयें पळालिया, दूतीं । धेनू विराटपुराप्रती । लावूनियां पातला पुढती । त्रिगर्तातें दाटित. ॥ १०५ ॥ गदा घेऊनि वृकोदर । ताडूं लागला मत्त-कुंजर । किंकाळिया मारूनियां, गिरिवर । कोसळे, तैसे कोसळती. ॥१०६॥ अंगा घालितांचि क्षिती । दंत उपडिले दोहीं हातीं, । घाव घालितां महावंतीं । स्वर्गलोका ठाकिले. ॥ १०७ ॥ पुच्छ गुंडाळूनि हाता । गदा वोपी राउत-माथां । मैकरतोंडीं ताडी लाता । रथ भंगोनि सांडितू. ॥ १०८ ॥ गदा वोपितां सत्वर । पडती पायाचें मोगर, । एक वेळ शतसहस्र । प्रेतदशा पावती. ॥ १०९ ॥ सुशर्मा वाहोनियां चाप । बाण सोडी अतिअमूप, । सहदेव खंडी जैसे सर्प । गरुडमुखें तडतडां. ॥ ११० ॥ सुशर्म्याचें शरसंधान । जेंवी वांकुडी घाली घन । पांडवबाण प्रळयपवन । उडवोनि सांडी क्षणार्धें. ॥१११॥ कोटि पापाचे विशाळद्रुम । कुठार विष्णुसहस्रनाम । तैसा तो पांडवोत्तम । शत्रुशस्त्रें विखंडी. ॥ ११२ ॥ दरिद्रकाळींच्या कोटी आपदा । नासूनि सांडी धनसंपदा । तेंवी शत्रूची शरबाधा । माद्रीसुतें खंडिली. ॥ ११३ ॥ निशाकाळींचीं उँडुगणें । नाशिती येतां सूर्यकिरणें, । तेंवी पंडूचिया नंदनें । शत्रुबाणांतें खंडिलें. ॥ ११४ ॥ अप्रीतिकाळींचे कुशब्दु । नाशिती स्नेहाचे सुशब्दु । सुशर्म्याचीं शस्त्रें विविधु । नकुळानुजें छेदिलीं. ॥ ११५ ॥ स्मशानभूतांचिया कोटी । रात्रीं भ्यासुर भासती दृष्टीं; । नृसिंहमंत्र जपतां ओंठीं । जेंवि पळती दशदिशा. ॥ ११६ ॥ नानाविध भूताकृती । नाहींच करिती ब्रह्मसंयुति । तेंवि शत्रुशस्त्रांचिया पंक्ती । शून्य केल्या सहदेवें.

१. किती? २. उभें राहिलें. ३. पारध्यांनीं जाळें घातल्याप्रमाणें [नकुळानें] सभोंवतीं बाणांचें जाळें पसरलें. ४. भीम. ५. रथाचे मुखावर. ६. आच्छादन. ७. नक्षत्रें. ८. सहदेवानें. ९. ब्रह्मज्ञानाचा योग.

॥ ११७ ॥ या नंतरें [1]चत्वारि शरीं । चारी [2]वारू भेदिले उरीं, । सारथीशिर उडवोनि वरी । नक्षत्रगणने धाडिलें. ॥ ११८ ॥ लात ओपोनि हृदयकमळीं । सुशर्मा पाडिला पृथ्वीतळीं, । केश कवळूनियां करतळीं । हस्त मागें बांधिले. ॥ ११९ ॥ भीमें उचलितां गदाघातू । नकुळें धांवूनि धरिला हातू, । 'धर्मरायाचा आज्ञासेतू । भंगूं नये सर्वथा.' ॥ १२० ॥ मुक्त करूनि विराटनृपती । आरूढ केला कनकरथीं । किरीट कुंडलें आपुले हातीं । लेवविलीं सन्मानें. ॥ १२१ ॥ लेववोनी वस्त्राभरणा । म्हणती, 'आम्ही किंकर जाणा । आतां धर्माचिया दर्शना । परतोनि मागां चालिले. ॥ १२२ ॥ सुशर्मा धरूनियां केशीं । वेगीं आणिला धर्मापासीं । म्हणती, 'घाव घालूं [3]शिरशीं, । किंवा सोडूं? सांग पां.' ॥ १२३ ॥ भीम म्हणे, 'रे पापखाणी! । 'दास' ऐसें न म्हणतां वदनीं । [4]मंगळमाता सुवासिनी । रक्तकुंकुमें चर्चणें.' ॥ १२४ ॥ धर्म म्हणे, 'पावलें सकळ, । टाकून जावो आपुलें दळ, । वदों नये तें गुह्य सकळ । प्रकट गोष्टी न बोलें. ॥ १२५ ॥ जें जें तुवां दृष्टी देखिलें । मनें असेल संकल्पिलें । तें तें सुखें न बोलिजे बोलें । काळें प्रकट होतसों.' ॥ १२६ ॥ सुशर्मा सोडिलियावरी । विराट पातला दळभारीं । वाद्यें लागलीं महागजरीं । नानापरी सुस्वरें. ॥ १२७ ॥ अवघीं केला जयजयकार । विजयी जाला राजेश्वर. । नेणते म्हणती 'प्रताप थोर'; । जाणते म्हणती 'परधर्में'. ॥ १२८ ॥ विराट विचारी अंतरीं, । 'प्राण रक्षिला चौघां वीरीं । बुडालों उपकारसागरीं । मैनाचळासारिखा.' ॥ १२९ ॥ पृथ्वीवरी फांकली मात । विराटरायाचे विक्रीत भृत्य । हे आजी नसते तरी घात । कौरव करिते निर्धारें. ॥ १३० ॥ पांडव किंवा आन कोण्ही । तत्वता नेणवे माझे मनीं । याचे तुळणें बळसंपन्नी । भुवनत्रयीं न देखों. ॥ १३१ ॥ लटिकें यश पातलें माथां । संतोष न वाटे माझिया चित्ता । कृत्रिमवेशें 'राजा' म्हणतां । दरिद्र न वचे अंगींचें.' ॥ १३२ ॥ उत्तम वाजी आणि कुंजर । वसनें धनें अलंकार । नानारत्नांचे संभार । सांडविले [5]पैरांचे. ॥ १३३ ॥ संपदा घालूनियां हस्तीं । रणभूमिके केली वस्ती । पुढां वर्तलें तें भूपती । जन्मेजया परिसीजे. ॥ १३४ ॥ दक्षिणगोग्रहणाची कथा । तुवां आणिली श्रवणपथा । उत्तरगोग्रहणअमृता । प्राशवीन

---

१. चार बाणांनीं. २. घोडे. ३. मस्तकावर. ४. गदा मस्तकावर मारून रक्तानें व्याप्त करितों. ५. शत्रूंचे.

सुश्रवणें. ॥ १३५ ॥ मुक्तेश्वराचें बोलणें । परिसतां संत निवती श्रवणें । विश्वंभरा अर्पून मनें । परमानंदें डुल्लती. ॥ १३६ ॥

---

## अध्याय सहावा.

येरीकडे कौरवदळ । माजलें जैसें वडवानळ । विराटसेनासमुद्रजळ । प्राशावया चालिलें. ॥ १ ॥ ना ते सेना समुद्रजळ, । विराट तोचि सैंधवाचळ । विखावयालागीं प्रबळ । वीरश्रीये माजला. ॥ २ ॥ कीं कृतायुगींचे धर्म निर्मळ । नाशावया लागीं कळीकाळ । घेऊनि दुष्टगुणाचा मेळ । उठावला ज्यापरी. ॥ ३ ॥ गंगातनय भारद्वाज । शकुनी सैंधव सूर्यात्मज । दुर्योधन कौरवराज । एकशत बंधुसीं, ॥ ४ ॥ आरूढ झाले कनकरथीं, । ध्वज शोभले नानाकृती, । छत्र कळसांचिया दिप्ती । भानुतेज लोपलें. ॥ ५ ॥ ढळती कनकदंड चामरें । भाळीं कस्तुरी नव केशरें । अंगीं वेष्टिलीं दिव्यांबरें । मुक्ताफळीं सुजडित ॥ ६ ॥ शाव्यायन भद्रजाती । पुढां जोडिले मत्तहस्ती । सेंदूर कुंभस्थळावरुती । [1]अरुणरंगासारिखा. ॥ ७ ॥ दंतीं जोडिले स्वर्णबंध । रत्नें झळकती नानाविध । [2]अंदू नेपुरांचा नाद । घंटानादीं मिसळला. ॥ ८ ॥ पताकावरी सुवर्णतगटें । पृष्ठी मिरवती सूर्यपुटें । [3]मैहावंत बैसले नेटें । शूळ हातें झाडिती. ॥ ९ ॥ काळांजनगिरीचे वाळ । तेंवी कुंजर महाविशाळ । शुंडा उचलोनियां सरळ । ऐरावता 'ये' म्हणती. ॥ १० ॥ पैजा जिंकिती पवनवेगा । तैसी चपळता महातुरंगां, । आभरणें बाणलीं अंगा. । वरी राउत वळघले. ॥ ११ ॥ सेनासागरींच्या नौका । तैसे रहंवर धांवती देखा । वस्तू भरलीया अमोलिका । शस्त्रें अस्त्रें सुतेजें. ॥ १२ ॥ ब्रिदें खोवोनि भुजादंडीं । साधना दाविती कडोविकडी, । पायींचे वीर चालिले प्रौढी । शत्रुसेना विभांडूं. ॥ १३ ॥ कुंजरभेरी चंडानना । गर्जतां म्हणती राहें घना । वोसरोनि जाशी कृपणा । घोष न करीं वाउगा. ॥ १४ ॥ निशाण दुंदुभी रणतुरें । तडकें बुजालीं खेचरें । यंत्रबाण एकसरें । गगनमार्गें उसळती. ॥ १५ ॥ पातले विराटपुरानिकटीं, । वळल्या गोधनाच्या थाटी । रक्षकांच्या पिटोनि पाठी । हाक नगरीं धाडिली. ॥ १६ ॥ उत्तरें सांगती उत्तरा, । '[4]धाडी पातली राजकुमरा ! । गोधनें हरिलीं, सर्व नगरा । नागविती निर्धारें. ॥ १७ ॥

---

१. 'अरुणमंडळे स्थापिली' असें पाठांतर. २. पादभूषणविशेष. ३. माहूत. ४. धाड आली.

राजा गुंतला संग्रामीं, । युद्धा गेलें पाहिजे तुम्हीं । स्त्रिया बंदीं पडतां ग्रामीं । महा आकांत माजेल.' ॥ १८ ॥ 'पुरुषमात्र गेले रणा' । हेळसोनी बोलती अंगना । 'पुरुष होई, कां भूषणां । स्त्रियांचिया स्वीकारीं.' ॥ १९ ॥ उत्तर बोले पुरुषार्थें, । '[१]पराभवितों परचक्रातें; । परी सारथी नाहीं मातें, । एकल्या युद्ध घडेना. ॥ २० ॥ सारथी मिळे हो! अभंग । तरी खंडितों परदळाचें [३]डंग. । आतां जातसें तुमचा भोग । होणार तैसा होतसे. ॥ २१ ॥ मी करीतसें पलायन, । तुम्हीं प्रारब्धा जावें शरण.' । स्त्रिया म्हणती, 'धन्य! धन्य! । मत्स्यकुळीं कुळपुत्रा! ॥ २२ ॥ पुत्र प्रसवावे [४]कौंतियें; । इतर जितचि प्रेतकाया । नपुंसकलिंगें लोंबती वाया । कीं फळें आलीं [५]अर्कीतें. ॥ २३ ॥ शेळीगळींचे गळस्तन, । तेंवी पुरुष करणीहीन, । स्मशानीचें भग्न भाजन । जळो जिणें तयाचें.' ॥ २४ ॥ येरु म्हणे, 'गेलिया प्राण । स्त्रियांलागीं पुसे कोण? । कैंचे पुत्र? कैंचें धन? । कैंचें सदन कवणाचें?' ॥२५॥ सैरंध्री म्हणे, 'गा नृपाळा! । प्रार्थूनि पाहें बृहन्नळा, । पार्थासंगें सारथ्यकळा । साधिली असे नेटकी. ॥ २६ ॥ अंगिकारील मनोभावें, । तरी सारथ्य करील बरवें, । संग्रामीं जिंकोनि कौरवें । [६]कीर्तिभाजा पैंर्णिसी. ॥ २७ ॥ उत्तर म्हणे, 'बृहन्नळे! । परचक्र पातलें महाबळें. । युद्धा इच्छीं परि न मिळे । रथीं सारथी मजजोगा.' ॥ २८ ॥ हांसोनि बोले बृहन्नळा, । 'म्यां रक्षावी नृत्यशाळा, । तथापी ऐसिया संकटकाळा । सारथ्य करीन मी तुझें. ॥ २९ ॥ विलंब न करीं ऊठी वेगीं, । सत्वर रथातें संजोगीं.' । रहंवरीं जोडले तुरगी । बृहन्नळें स्वहस्तें. ॥ ३० ॥ अंगीं लेववूनि त्राण, । हातीं दीधले धनुष्यबाण, । पाठीसीं घाळूनि आपण । पुढां धुरे बैसला. ॥ ३१ ॥ चढवुनी कंचुकीच्या पदरा । झाडोनि बांधिलें [८]कबरीभारा, । हृदयाहुनी वस्त्रपदरा । नाभिस्थानीं खोविला. ॥ ३२ ॥ नारी करिती [९]अेक्षवाणें, । ब्राह्मण देती आशीर्वचनें, । बहिणी म्हणती वस्त्राभरणें । अपार आम्हां आणावीं. ॥ ३३ ॥ [१०]प्रतोद घेवोनियां हातीं । रथ लोटिला सत्वरगती, । विमानयानीं अमरपंक्ती । म्हणती 'अद्भुत मांडिलें.' ॥ ३४ ॥ वामें उजू गेले [११]तांस, । सव्य गेले वायस, । पुढें भेटले पूर्णकलश । आणि गोरस घृतपात्रें. ॥ ३५ ॥ कुंकुमयुक्त सुवासिनी । फळें

१. हिणवून. २. पराभव केला असता. ३. रान. ४. कुंतीनें. ५. रुईच्या वृक्षाला. ६. कीर्तिरूप स्त्री. ७. वरिशील. ८. वेणीचा बुचडा. ९. आरती. १०. चाबूक. ११. चाषपक्षी.

अर्पिती पंच ब्राह्मणीं, । मयूर आणि शिखंडिणी । तांडवनृत्यें नाचती. ॥३६॥ मुखीं मुक्ताफळांचे घोंस । सन्मुख पातले राजहंस, । कर्दळीसहित फळें मांस- । विक्रयकार भेटले. ॥ ३७ ॥ स्मरोनि श्रीकृष्णचरण, । पाठी वि[1]राटनृपनंदन, । [2]अंगनावेशें तो अर्जुन । रणभूमिके पातला. ॥ ३८ ॥ देखोनियां कौरवांचे भार । उचलिले जैसे गिरिवर, । पर्वतमाथां जैसे तरुवर । तेंवी दिसती गजपृष्ठीं. ॥ ३९ ॥ किंकाळिया मारिती गजघंट, । वारू हिंसती उद्भट, । सै[3]रा रथाचे घडघडाट । सिंहनाद वीरांचे. ॥ ४० ॥ सहस्र छत्रें भीष्मावरी, । सहस्रार्ध द्रोणावरी, । तीन शतें चंद्राकारी । कर्णमाथां मिरवती. ॥ ४१ ॥ जडीत किरीट नीळरत्नीं । गरुडपाचूचीं कुंडलें श्रवणीं । पदकमाळा करकंकणीं । पाचूरत्नें जडियेलीं. ॥ ४२ ॥ वेढियेलीं पै[4]ट्टकूळवस्त्रें । नीळवर्ण सहस्र छत्रें । नीळरथीं राजपुत्रें । दुर्योधनें मि[5]रविजे. ॥ ४३ ॥ युद्धा येईल विराटदळ । म्हणोनि योद्धे [6]उदित सकळ, । एक म्हणती, 'तो निर्बळ । भग्न होईल झुंजतां.' ॥ ४४ ॥ येतां देखोनी एक रथ । अवघे म्हणती, 'हें अत्यद्भुत.' । सकळिकांचे चक्षू येथ । एके ठायीं मी[7]नले. ॥ ४५ ॥ 'आठ अक्षौहिणी सेना, । एके रथेसीं पातला रणा । तोही दिसे हो! अंगना । पाठीं बाळक नेणतें! ॥ ४६ ॥ एक विनोदें [8]उपहासिती, । एक देखोनी साशंक चित्तीं, । एक म्हणती, 'इये क्षिती । युद्ध दारुण दिसताहे. ॥ ४७ ॥ असंख्यदळावरी एकला । युद्धालागीं जो पातला, । होईल अवतारपुरुष भला । भार्गवरामासारिखा'. ॥ ४८ ॥ भीष्म पाहे स्तब्धदृष्टी, । द्रोण विस्मयो मानी पोटीं, । दुर्योधनाचे हृदयपुटीं । कंप कांहीं संचरला. ॥ ४९ ॥ कर्ण म्हणे, 'अवचिन्ह गाढें[9] । ईश्वरमायेचें कुंवाडें, । [10]सर्षप भाविला, परि पुढें । महापर्वत ओढवला'. ॥ ५० ॥ शकुनी म्हणे, 'फिरा मागें । हस्तनापुरा ठाका वेगें.' । पिंगळा पक्षिणीतें सांगे । अपेश हाणी कौरवां. ॥ ५१ ॥ असो, देखोनी कौरवभारा । भय सुटलें विराटकुमरा । गात्रें कांपती थरथरां । भों[11]वंडी नेत्रां दाटली. ॥ ५२ ॥ म्हणे, 'व्याकुळ माझें मन, । कासावीस होतसे प्राण, । [12]नपुंसकाचे बुद्धी मरण । तत्काळिक पावलों. ॥ ५३ ॥ कैचें युद्ध? कैचें नाव? । [13]आपण वांचल्या पावलें

---

१. विराटराजाचा पुत्र (उत्तर). २. स्त्रीवेषानें. ३. झपाट्यानें चालणारे. ४. रेशमी वस्त्रांनीं. ५. हा भावी प्रयोग आहे. 'पुत्रासह दुर्योधन मिरवितो,' असा अर्थ. ६. उठलेले सिद्ध. ७. जडले. ८. थट्टा करितात. ९. कोडें गूढ. १०. मोहरीसारखा अल्प पदार्थ. ११. भ्रम, घेरी. १२. या नपुंसकाच्या म्हणजे बृहन्नळेच्या बुद्धीला लागून. १३. 'प्राण' पाठांतर.

सर्व, । प्रळयानळा देतां खेंवें[1] । पतंग वांचे केउता ? ॥ ९४ ॥ असंख्यात रण[2] कर्कश । करूं पाहती ब्रह्मांडग्रास, । एके रथेंसीं क्लीब पुरुष । मरून मारील मजलागीं.' ॥ ९५ ॥ उडी घालोनी तळवटीं[3] । पळों लागला नगरवाटी,[4] । पार्थ धावूनियां पाठीं । केश मुष्टीं कवळिले. ॥ ९६ ॥ कौरववीर पाहाती दृष्टीं । नाना कौतुकें करिती पोटीं, । टाळिया पिटोनि करतटीं । हास्य करीती विनोदें. ॥ ९७ ॥ पृष्ठिभागीं गौरवर्णी । धांवतां हाले विशाळ वेणी,[6] । चालतां वोळखोनि चिन्हीं । द्रोण पाहे भीष्माकडे. ॥ ९८ ॥ नंदीजा करी भ्रूसंकेत, । 'हा लंकेशवनारिकेत[8] । जाणोनियां मनांत । गूढ गुह्यार्थ रक्षावा. ॥ ९९ ॥ जयातें नगाचें[9] अभिधान, । नगारीचा[10] प्रिय नंदन, । अंगनावेषें हा अर्जुन । वोळखिला वोळख तूं. ॥ ६० ॥ रणीं जिंकोनी आमुतें । गाई नेईल हा निश्चितें, । यालागीं तुम्हीं पुरुषार्थें । आजी कौरव रक्षावे.' ॥ ६१ ॥ झोंटीं[11] धरूनि विराटसुता[12] । आणोनि बांधिला रथावरुता. । म्हणे, 'मी येथें संग्राम करितां । भय सर्वथा तुज नाहीं. ॥ ६२ ॥ माझिया दृष्टी जैसीं तृणें । उडवोनि सांडीन अर्धक्षणें, । तुवां नावेक[13] स्वस्थमनें । मजपाठीसीं बसावें.' ॥ ६३ ॥ विभूती चर्चूनियां भाळीं[14] । वरदहस्त स्पर्शला मौळीं[15] । ते वेळीं भयाची काळजी । फिटोनि गेली तत्काळ. ॥ ६४ ॥ म्हणे निर्भय दक्ष, । 'स्मशानभूमिके शमीचा वृक्ष । तेथें जाऊनि प्रत्यक्ष । शस्त्रें माझीं विलोकीं. ॥ ६५ ॥ माझिया दशनामाचा जप । करीं, धरूनि शुद्ध संकल्प, । ते वेळीं लोपोनियां सर्प । शस्त्रें दृष्टीं देखसील. ॥ ६६ ॥ तालप्रमाण गांडीव चाप, । ज्यावरी सूर्यतेजाची ओप । सुवर्णवर्ण इंद्रगोप । मागां पुढां रेखिले. ॥ ६७ ॥ रत्नमुष्टी[16] कांचनकोश[17] । तोंडीं झळकती रविप्रकाश । धारेपासूनि तीव्र हुताश । स्फुल्लिंग[18] झाडी सुतेज. ॥ ६८ ॥ ऐसी माझी खड्गलता । व्याघ्रचर्मीं वेष्टित देखा । ते सोडोनि नरनायका ! । परमयत्नें आणावीं. ॥ ६९ ॥ [19]क्षीरार्णव भरला रत्नां,[20] । निधी नवचे

---

१. आलिंगन. २. युद्धामध्यें कठोर पुरुष. ३. तळीं, भुईवर. ४. नगराची वाट धरून. ५. 'तर्क' पाठांतर. ६. हें बृहन्नळेचें वर्णन आहे. ७. भीष्माला. ८. लंकापति जो रावण त्याच्या वनाचा शत्रु जो मारुति तो ध्वजावर आहे ज्याच्या तो म्हणजे अर्जुन. ९. 'अर्जुन' असें वृक्षाचें नांव. १०. इंद्राचा. ११. शेंडीं. १२. उत्तराला. १३. क्षणभर. १४. कपाळीं. १५. मस्तकाला. १६. रत्नाच्या मुठी. १७. सोन्याचें म्यान (मेण). १८. ठिणग्या. १९. क्षीरसमुद्र. २०. कितीही सुवर्णें काढिलीं तरी रिकामा न होणारा ठेवा.

सुवर्णीं । अक्षयी भाता भरला बाणीं । सुवर्णकवचें वेष्टिला. ॥ ७० ॥ हेमगोफीं गुंफिले मणी । झळकती बाळार्काच्या किरणीं । बिरडां[1] गोविलें माणिकमणी । वोळखोनी आणावे. ॥ ७१ ॥ जें उजळिलें चंद्रओपें[2] । चारी खगें, चत्वारि चापें । मत्स्यकूर्मवराहरूपें । कनकोदकें[3] ज्यावरी. ॥ ७२ ॥ रत्नरागें[4] अतिसोज्वळ । रेखिले सिंह आणि शार्दूळ । गरुडहनुमंतरूपें कुशळ । हेमपत्रीं शोभती. ॥ ७३ ॥ चारी बांधोनियां वरुती । माझीं आणावीं अतिनिगुती.[5]' । विराटपुत्र करी विनंती, । 'नामें कैसीं सांग पां.' ॥ ७४ ॥ 'अर्जुन, फाल्गुन आणि जिष्णु, । किरीटी, पांचवें श्वेतवाहनु,। बीभत्सु, विजयी, आठवा कृष्णु । सव्यसाची धनंजय. ॥ ७५ ॥ दाही नामें जपतां ओठीं । विघ्नें पळती बारावाटीं, । विजयलक्ष्मी बैसे पाठीं, । दरिद्र दृष्टी दिसेना.' ॥ ७६ ॥ पुढती पुसे प्रार्थून, । 'नामें पडावया काय कारण? । दाही नामांचें आख्यान । सांगोपांग मज बोधीं. ॥ ७७ ॥ जिंकोनि भूपाळांचीं धनें । यज्ञीं देव ब्राह्मण दीनें । तोषवी म्हणोनि व्यासवचनें । धनंजय हें नांव. ॥ ७८ ॥ देव दैत्य मानव राजा । जिंकूनि वरिली कीर्तिभाजा[6] । यालागीं विजयी महाराजा । नाम साजे तयातें. ॥ ७९ ॥ रजताचळातुल्य[7] धवळें । झुंजतां बळ चढे आगळें । यालागीं बोलिजे देवपाळें[8] । श्वेतवाहन हें नांव. ॥ ८० ॥ पूर्वाउत्तराफाल्गुनीमध्यकाळीं । हिमाचळगिरीच्या मौळीं । जन्मला म्हणोनि सुरसकळीं । फाल्गुन ऐसें बोलती. ॥ ८१ ॥ निवातकवच[9] मारिले रणीं । किरीट लेववी वज्रपाणी[10] । यालागीं किरीटी ऐसें जनीं । नाम पहिलें तयाचें. ॥ ८२ ॥ कल्पांतभैरवतुल्य[11] रणीं । देवां दैत्यां भासे नयनीं । यालागीं बीभत्सु व्यासमुनी । नाम ठेवी तयाचें. ॥ ८३ ॥ वामदक्षिण दोन्ही करीं । गांडीव[12] आकर्षी रणचत्वरीं । यालागीं बोलिजे सुरासुरीं । सव्यसाची[13] हें नांव. ॥ ८४ ॥ काया वाचा आणि मनें । कर्में निपजती सत्वगुणें । सत्वाचेनि सत्वपणें । अर्जुन नाम त्या साजे. ॥ ८५ ॥ अर्जुनवृक्षाऐसा धवळ । कर्में सत्वगुणी[14] स-

---

१. ज्याला माणिकमण्याचें बिरडें लाविलें आहे. २. चंद्रप्रकाशानें. ३. सोन्याच्या पाण्यानें. ४. रत्नांच्या रंगांनीं. ५. उत्तम रीतीनें. ६. कीर्तिरूप स्त्री. ७. रुप्याचा पर्वत. ८. इंद्रानें. ९. प्रल्हादभ्राता संन्हाद याचे पुत्र. हे समुद्रतीरीं राहून इंद्रास उपद्रव देत असत. त्यांचा अर्जुनानें वध केला. १०. इंद्र. ११. कल्पांत करणारा भयंकर पुरुष. १२. अर्जुनाच्या धनुष्याचें नांव. १३. डाव्या हातानेंही बाण जोडणारा. १४. सत्वगुण शुभ्रवर्णी मानिला आहे. निर्मळ यशही शुभ्रवर्ण मानिलें आहे.

कळ । निपजती म्हणोनि यश निर्मळ । अर्जुन ऐसें बोलिजे. ॥ ८६ ॥ [1]अं-
तरीं [2]साही शत्रूंचें दमन, । [3]बाह्यें दैत्यदानवां कदन, । कर्ता म्हणोनि श्रेष्ठजन ।
जिष्णु[4] ऐसें बोलती. ॥ ८७ ॥ कृष्णदर्शनीं आवडी गहन, । कृष्णीं वेधलें
तनु मन, । यालागीं स्थापी स्नेहसंपन्न । कृष्णनाम आवडी. ॥ ८८ ॥ ऐसीं
पवित्र दाहा नामें । तुज म्यां सांगितलीं अतिउत्तमें, । ज्याचीं तो मनोधर्में । अ-
र्जुन ऐसें वोळखें.' ॥८९॥ 'नामें सांगा हीं कवणाचीं?' । पार्थ म्हणे, 'अर्जुनाचीं, ।
ज्याचें नाम सव्यसाची । हरी सारथी जयाचा.' ॥ ९० ॥ पुढतीं विनवी जो-
डूनि पाणी, । 'अर्जुन असे कवणे स्थानीं?' । पार्थ म्हणे वोळखें नयनीं । अ-
र्जुन तो मी बृहन्नळा. ॥ ९१ ॥ कंक तो धर्मराज जाण, । बल्लव तो भीमसेन, ।
ग्रंथीक माद्रीचा नंदन, । नकुळ ऐसें जाण पां. ॥ ९२ ॥ तंतिपाळ सहदेव
गुणी, । सैरंध्री ते [5]याज्ञसेनी.' । हें ऐकोनि मस्तक चरणीं । विराटपुत्रें ठे-
विला. ॥ ९३ ॥ म्हणे, 'स्वामी नरेंद्रपाळा! । आतां न भियें मी कळिकाळा. ।
सारथ्य करूनि पृथ्वीपाळा । तोषवीन संग्रामीं. ॥ ९४ ॥ नमस्कारोनि पार्थ-
गुरू । येऊनि वंदिला शमीचा तरू । मुखें करितां नामोच्चारू । शस्त्रें दृष्टीं
देखिलीं. ॥ ९५ ॥ निवडोनि अर्जुनाचीं शस्त्रें । येरें[6] वृक्षीं बांधिलीं करें ।
खांदीं वाहूनि सुखनिर्भरें । पार्थानिकटीं पातला. ॥ ९६ ॥ हृदयीं स्मरण क-
रितां पार्थ । मही उतरला विजयी रथ, । श्वेतवाजी, वानरकेत, । रत्नें चाकीं झ-
ळकती. ॥ ९७ ॥ [7]आस्फुरितां देव[8]दत्त । नाद भरला ब्रह्मांडांत, । कौरव
म्हणती, 'आला मृत्य । किंवा पार्थ प्रगटला.' ॥ ९८ ॥ उत्तर करूनियां
सारथी । अर्जुन [9]आरूढला रथीं । संतोषोनि [10]अमरपती । दिव्यसुमनीं[11] वर्षला,
॥ ९९ ॥ भालीविना तीन बाण । [12]आपुंख सुवर्णवर्ण । सोडोनियां श्रेष्ठचरण[13] ।
स्पर्शलासे सद्भावें. ॥१००॥ 'भीष्मद्रोणकृपाचार्या,' । म्हणे 'नमन तुमच्या पायां, ।
तुमच्या आशिर्वादें जया । मी पावेन संग्रामीं'. ॥ १०१ ॥ रथ लोटितां क्षत्रि-
यपाळें । थरारिलीं सप्तपाताळें । कौरवसैन्य खळबळिलें । तडागोदर ज्यापरी.
॥ १०२ ॥ लोटोनियां [14]सैरितापुरीं । पोतें[15] पालवी कां पैलपारीं । तेथूनियां
कर्णधारी । ऐलतीरा धाववी. ॥ १०३ ॥ त्यापरी लोटितां स्यंदना । द्विभाग

---

१. मनांत. २. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे सहा शत्रु. ३. उघडपणें. ४. 'जिष्णु' म्हणजे जिंकणारा असा अर्थ आहे. ५. द्रौपदी. ६. इतर शस्त्रें पुनः वृक्षावर बांधिलीं. ७. फुंकितां. ८. अर्जुनाच्या शंखाचें नांव. ९. चढला. १०. इंद्र. ११. पुष्पांनीं. १२. मुठीपर्यंत. १३. गुरूंचे चरण. १४. नदीच्या पुरामध्यें. १५. नौका.

आतली[1] शत्रुसेना । तेथूनि करीतचि गर्जना । पूर्वठाया पातला. ॥ १०४ ॥ पूर्वपश्चिम एक वाट, । उत्तर दक्षण उजू नीट, । धांवतां सेनांचे संघाट । चारी भाग आतले. ॥ १०५ ॥ पुढती कौरवपुरामागें । धांवूनियां पाठिलागें । गाई परतोनियां मागें । अंगबळें आणिल्या. ॥१०६॥ घालूनियां नगरद्वारीं । आपण मिसळला कौरवभारीं, । ते वेळीं वीर हाहाकारीं । 'घ्या घ्या' म्हणती आवेशें. ॥१०७॥ अश्वत्थामा, शकुनी, कर्ण, । सैंधव, दुःशासन, विकर्ण, । धृतराष्ट्राचे शतनंदन । महायुद्ध मांडिलें. ॥ १०८ ॥ धनुष्य लावूनियां दारुण, । सोडिते झाले तीक्ष्ण बाण, । जैसी वांकडी[2] घाली घन । तैसें निविडें[3] माजलें. ॥१०९॥ अंकुशें डवचुनी कुंजर । पुढें लोटले शतसहस्र । खड्गें उचलूनि अश्वस्वार, । म्हणती, 'वेढुनी मारा कीं'. ॥ ११० ॥ फरश पट्टीश गदा मुसळ । घेऊनि उठिलें पायदळ, । म्हणती, 'तोषवूं पक्षिकुळ[4] । खंडविखंड करूनियां'. ॥१११॥ दृष्टी लक्षूनियां किरीटी । यंत्रबाणाचिया कोटी । गगनीं उसळती कडकडाटीं । महा नाद माजला. ॥ ११२ ॥ असंख्यात तडागोदरें । तडक फुटती एकसरें, । भयें बुजालीं कुंजरें । चक्राकारें भोंवती. ॥ ११३ ॥ अर्जुन म्हणे, 'कारण पुढा । प्रस्तुत काय निवेदूं मूढां? । काळिमा लावूनियां तोंडा । हस्तनापुरा बोळवूं'. ॥११४॥ कर्दळीपणें हरिद्रापणें । अर्जुनसायकांचीं[6] वदनें । जयावरुतीं सूर्यकिरणें । राहुभयें[7] वशिन्नलीं. ॥ ११५ ॥ कुंभस्थळें भेदुनी बाणीं । मुक्ताफळें सांडिती धरणी, । अशुद्धें[8] मेघधारासिंचनी । गारावृष्टी ज्यापरी. ॥११६॥ अश्व खोंचतात[9] हृदयीं, । उभे राहाती मागले पायीं, । राऊत पडोन भुई, । वरुती अश्व कोसळती. ॥ ११७ ॥ पिसांरें[10] पावले त्रास । पवनें उडविजे धान्यतुंस[11], । तेंवी पायदळाचें भूस । दाही दिशा उधळिलें. ॥ ११८ ॥ सायक[12] लागतां सतेज, । एकसरें[13] तुटले ध्वज; । जेंवी सुटल्या[14] महागज । कर्दळीवना विखंडी. ॥ ११९ ॥ रथ लोटोनियां आवेशें, । धनुष्यें[15] झाडी घंटाघोषें, । पांचशत सायक एकदोषें । कर्ण वीर क्षोभला. ॥ १२० ॥ पार्थें एक शतबाणें । छेदूनि सांडिले तत्क्षणें, । जैसीं कुतर्कियाचीं वचनें । वेदांतिया विखंडी. ॥१२१॥ चारी वारू[16] सारथी केतू[17] । खंड विखंड केला रथू, । ते वेळीं लगबगें सूर्यसुतू[18] ।

---

१. झाली. २. झड लावी. ३. अंधकार. ४. गृध्रादिपक्षी. ५. अर्जुनाला. ६. अर्जुनाच्या बाणांचीं मुखें. ७. बाणांच्या वृष्टीमुळें अंधकार पडूं लागतांच राहूच्या शंकेनें सूर्यकिरणें अर्जुनाच्या बाणांचा आश्रय करूं लागलीं. ८. रक्तें. ९. दचकतात. १०. बाणांनीं? ११. कोंडा. १२. बाण. १३. एकदांच. १४. सुटला असतां. १५. धनुष्यानें. १६. अश्व. १७. निशाण. १८. सूर्यपुत्र, कर्ण.

आणिके रथीं आरूढे. ॥ १२२ ॥ धनुष्या लावूनि सोडितां शरा, । पार्थें तोडिले बाणधारा, । संधीसंधी खोंचला बरा, । मूर्छा दाटे आगळी. ॥ १२३॥ विकळ पडतां रहंवरयानीं, । अति सत्वर धांवला द्रौणी, । वज्रतुल्यसहस्रबाणीं । धनंजयो ताडिला. ॥ १२४ ॥ द्रौणिशराच्या द्विगुणत्वें । बाण सोडिले कुंतीसुतें, । वक्षस्थळीं भेदूनि निरुते । हृदयवर्मी खडतरले. ॥ १२५ ॥ लावकपक्षिया झडपी श्येनें, । तैसे अर्जुनाचे बाण । शत्रुशरांतें छेदून । सर्वगात्रीं भेदिले. ॥ १२६ ॥ चिरंजीविया निर्जीवी । दृष्टी देखतां मानवीं देवीं । शकुनी म्हणे, 'यशपदवी । मी भोगीन आजि संग्रामीं.' ॥ १२७ ॥ सन्मुख येतां लागवेगें । सहस्रबाणीं सारिला मागें, । जेंवि कां नामस्मरणीं भंगे । ब्रह्महत्या तात्काळीं. ॥१२८॥ म्हणे, 'हां सहदेवाचा भाग । कलहा मूळ, अपवित्र मांग. । याचें पापरूप आंग । बाण माझे न शिवती. ॥ १२९ ॥ धृतराष्ट्राचे एकशतपुत्रीं । घेउनी पंचें पंचक पत्री । पार्थ लक्षुनियां नेत्रीं । इडेपाडे विंधिला. ॥ १३० ॥ त्याचें वारूनि शरसंधान । लक्षूनि नृपाचे नंदन । पंच पंचबाणेंकरून । भाळपटळीं विंधिले. ॥ १३१ ॥ दुर्योधनें वाहूनि मेढा, । सायक सोडितां दडदडां, । म्हणे, 'निमित्त मातें मूढा! । व्यर्थ कासया आणिसी ?॥१३२॥ तुजला वधिता असे आन, । समय पाहे धरुनी मौन, । आतां रक्षूनियां प्राण । होई परता निर्लज्जा!' ॥ १३३ ॥ रक्षावया नृपाचें मन । आळस्यें वाहून धनुष्यबाण । कृपाचार्य भीष्म द्रोण । अर्जुना उजू धांवती. ॥ १३४ ॥ तिघांजणीं तीन शतें । शर टाकिले पार्थावरुते । शतसायक लक्षुनि निरुते । पुष्पप्राय उडविले. ॥ १३५ ॥ यावरी पार्थें मौन्यास्त्रमंत्रीं । एकशत तेहतीसाक्षरीं । काळरात्री कान्हेश्वरी । आव्हानिली देवता.॥१३६॥ मौन्यास्त्रविद्येमाजी देखा । देवदत्तमहाशंखा । आस्फुरितां कौरवकटका । निचेष्टता पातली. ॥१३७॥ अळकापुरनिवासिनी । संसारबंधविच्छेदिनी । इच्छितफळप्रदायिनी ।

---

१. दुसऱ्या. २. रथरूप वाहनीं. ३. द्रोणपुत्र अश्वत्थामा. ४. जोरानें शिरले. ५. ससाणापक्षी. ६. चिरंजीवी अश्वत्थामा. ७. मानवांनीं आणि देवांनीं. ८. मोठ्या वेगानें. ९. ईश्वरनामस्मरणानें. १०. हा शकुनी सहदेवाच्या वांट्याचा. सहदेवानें मारावयाचा. ११. पांच पंचकड्या (पंचवीस). १२. बाण. १३. त्वरेनें. १४. कपाळावर. १५. धनुष्य. १६. अन्य. (भीम.) १७. वाट पाहा. १८. अर्जुनासमोर. १९. आव्हान केलें, मंत्रेंकरून बोलाविली. २०. अर्जुनाच्या शंखाचें नांव. २१. फुंकितां. २२. कौरवसैन्याला.

प्रगट झाली चिंतितां. ॥ १३८ ॥ सकळांमुखीं मौन्यमुद्रा, । नेत्रीं दाटली घोर निद्रा, । हृदयाकाशीं मनचंद्रा । भ्रमराहुनें ग्रासिलें. ॥ १३९ ॥ प्रेतप्राय झाले सकळ, । इंद्रियीं सांडिली चळवळ, । कृत्रिमलेपें जैसे [1]अचळ । तैसे दृष्टी भासती. ॥ १४० ॥ बाण सोडूनि अर्धचंद्र । अर्ध[2]खाड अर्ध[3]श्मश्रू । अर्धमस्तकीं केशभारू । मुंडण करूनि टाकिले. ॥ १४१ ॥ कृप भीष्म [4]द्रौणी द्रोण । हे चौघे करून भिन्न, । इतर समस्तांचीं जाण । मुखमस्तकें मुंडिलीं. ॥ १४२ ॥ उत्तरा निरोपी अर्जुन, । 'भीष्मद्रोण करूनी भिन्न । वस्त्राभरणें फेडुन । सर्वांचींही आणावीं.' ॥ १४३ ॥ '[5]तुझिये भगिनीचा निरोप । वस्त्राभरणें अति अमुप । आणावीं, वरि हा [6]आक्षेप । तुज माझिये आज्ञेचा.' ॥ १४४ ॥ उत्तर धाविन्नला सत्वरें । [7]चीर भूषणें अपारें । कौरवरथीं पर्वताकारें । आपुले हस्तीं भरियेलीं. ॥ १४५ ॥ उष्ट्रीं आणी वहु कुंजरीं । भरूनि दिधलीं [8]सेव-कांकरीं, । विराटपुत्र सुखनिर्भरीं । पार्थानिकटीं पातला. ॥ १४६ ॥ रणभूमी सोडूनि सुपवित्रा, । आकार्षिलें मौन्यास्त्रमंत्रा. । कौरव अवलोकिती गात्रा । तव सर्व सेना नागवी. ॥ १४७ ॥ लाधलीं तैसीं [9]वेढिलीं वस्त्रें, । लज्जाकाजळें लेपिलीं वक्त्रें, । अपकीर्तीचीं भंगिलीं पात्रें । केंवि मिरवणें लौकिकीं. ॥ १४८ ॥ खेद पावोनी अंतरीं । जातां लाजती हस्तनापुरीं, । [10]वृद्ध म्हणे, 'हो! सुविचारीं । धरूं नये शोकातें.' ॥ १४९ ॥ [11]उत्तरा सांगे अर्जुन गुणी, । 'जे त्वां दृष्टी देखिली करणी । कोणा न बोलावी वचनीं । जनाकर्णीं न लाविजे. ॥ १५० ॥ 'म्यांच पराभविलें वीरां । कौरव पळविले हस्तनापुरा,' । ऐसी विराटनृपवरा । [12]मात मुखें [13]अनुवादें. ॥ १५१ ॥ [14]झणीं घेशी माझें नांव.' । उत्तर म्हणे, 'कळला भाव. । [15]कृत्रिमभाग्याचा गौरव । खेद करी मानसा.' ॥ १५२ ॥ ऐसें बोलोनी तये काळीं । उत्तर पातला विराटाजवळी, । वार्ता ऐकोनी [16]गंडारोळीं । विराट नाचे संतोषें. ॥ १५३ ॥ लोकमुखें ऐकिला घोष; । 'उत्तर झुंजोनी पावला यश.' । विराट म्हणे, 'माझा वंश । सुपुत्रसूर्ये उजळला. ॥ १५४ ॥ क्षत्रियांमाजीं हा जगजेठी । रत्न निपजलें जननीपोटीं, । यातें तुळितां उपमे सृष्टी । दुजा दृष्टी दिसेना. ॥ १५५ ॥ दशरथ वसुदेव पंडु नृपती । जम-

---

१. चित्रें. २. दाढी. ३. मिशी. ४. अश्वत्थामा. ५. हें अर्जुनाचें भाषण आहे. ६. दाब, विशेष. ७. वस्त्रें. ८. सेवकांच्या हातीं. ९. गुंडाळिलीं. १०. भीष्म. ११. उत्तराला. १२. गोष्ट. १३. सांग. १४. कदाचित्. १५. लटक्या भाग्याचा मोठेपणा. स्वतः पराक्रम न करितां, मी आपली लटकी वढाई मिरविणें. १६. पांडित्य करून.

दग्नी आणी प्रभंजनमूर्ती[१] । या पुत्रवंतांचिया पंक्ती । मी श्लोघ्यता[२] पावलों. ॥ १९६ ॥ श्रीराम कृष्ण गांडीवधर[३] । भार्गव आणी हनुमंत वीर । यांचिये तुळणे हा उत्तर । पुत्र माझा प्रतापी. ॥ १९७ ॥ कौसल्या देवकी कुंती । अंजनी आणी रेणुका सती, । ययांतुल्य पुत्रवती । उत्तरें केली सुधेष्णा.' ॥ १९८ ॥ कंक म्हणे, 'धरित्रीपाळा[४] ! । संगीं असतां बृहन्नळा । कौरवजयाचा[५] आगळा[६] । प्रताप[७] वांया बोलसी.' ॥ १९९ ॥ विराट म्हणे, 'एकलें बाळ । तेणें भंगिलें कौरवदळ.' । येरू[८] म्हणे, 'अमृत फळ । हातीं असतां अक्षई ॥ १६० ॥ कायसी मरणभयाची वार्ता ? । तेंवी बृहन्नळा संगीं असतां, । कौरवजयाची हे कथा । बाळखेळासारिखी[९]. ॥ १६१ ॥ वन्ही व्यापोनी लोहगोळा, । तेणें[१०] जाळिजे अरण्य सकळा, । विचारितां[११] संगें अनळा । दाहक कार्य तयाचें. ॥ १६२ ॥ तेंवी बृहन्नळा पाठी[१२] । असतां, कृतांत[१३] तोही दृष्टी[१४] । तृणतुल्य[१५], हे सत्य गोष्टी । राया ! पोटीं[१६] जाण पां.' ॥ १६३ ॥ विराट म्हणे, 'न मानें[१७] मन, । उत्तर अरिगजपंचानन[१८], । त्यातें जंबूकप्राय[१९] दीन । क्लीब[२०] साह्य केउता ?' ॥ १६४ ॥ कंक म्हणे, 'यथार्थ[२१] वचन, । मोहें व्यापिलें[२२] तुझें मन. । परी तूं बोलसी तें वचन । निर्फळ पुढां जाणवेल. ॥ १६५ ॥ जैसें झुजोनी संग्रामीं[२३] । सुशर्मा पराभविला तुम्हीं, । तैसें उत्तरें पराक्रमीं । कौरवदळ भंगिलें.' ॥ १६६ ॥ शब्दें खोंचला विराट । क्रोध नावरे अचाट, । खेळत असतां सारिपाट । फांसे भूमी आफळिले. ॥ १६७ ॥ अक्ष[२४] ताडितां भूतळीं । उसळोनी लागला धर्मभाळीं[२५] । अशुद्ध[२६] स्रवतां[२७] पांचाळी । पात्र[२८] करी पुढारां. ॥ १६८ ॥ चक्रवर्तीचें शोणित[२९] तेथें । पडों नये भूमीवरुतें. । उदक आणोनियां हातें । भाळ वेगीं प्रक्षाळी[३०]. ॥ १६९ ॥ उत्तर कुमर पातला भेटी । रायासी[३१] आल्हाद नावरे पोटीं, । कंक म्हणे, 'माझिये भेटी । बृहन्नळा नाणावी. ॥ १७० ॥ तिणें रक्त देखतां

१. वायु. २. कीर्ति, मोठेपण. ३. अर्जुन. ४. पृथ्वीपाळा. ५. कौरवांना जिंकल्याचा. ६. मोठा. ७. पराक्रम. ८. इतर, तो. (कंक.) ९. पोरखेळासारखी. १०. लोहगोळ्यानें. ११. विचार करून पाहतां. १२. मागें, धैर्याला. १३. यम. १४. दृष्टीला. १५. गवतासमान, क्षुद्र. १६. मनामध्यें. १७. मनाची समजूत होत नाहीं. १८. शत्रुरूप हत्तीला मारणारा सिंह. १९. कोल्ह्यासारिखा. २०. नपुंसक, अर्जुन. २१. खरें. माझें भाषण सत्य आहे. २२. भ्रांतीनें, वेडेपणानें. २३. दक्षिणगोग्रहणांतील युद्धामध्यें. २४. फांसे. २५. कपाळाला. २६. रक्त. २७. वाहतां. २८. भांडें. (वरच्यावर रक्त धरण्यासाठीं.) २९. रक्त. ३०. धुई. ३१. विराट राजाला.

दृष्टी । प्र[1]ळय होईल सर्वसृष्टी.' । विराट[2] म्हणे, 'हाही पोटीं । भा[3]व मातें नेणवे.' ॥ १७१ ॥ पितया[4] संकेत करी नयनें, । 'माझें स्तवन न करीं वदनें. । याचा अभिप्राय निजमनें । जाणों येईल पुढारां. ॥ १७२ ॥ कंकादेखतां स्तुती करितां, । मूर्खत्व येईल तुझिया माथां. । स्वल्पकाळें पुढें आतां । कौतुक कांहीं देखशी.' ॥ १७३ ॥ सुवर्णताटीं अ[5]क्षवाणी । उत्तरा करिती बहु कामिनी, । वोवाळुनी सांडिती सांडणी । सुवर्णपुष्पें अपार. ॥ १७४ ॥ गौरवोनी उत्तरा बहिणी । शृंगारिली वस्त्राभरणीं, । सुधेष्णेसी जनकामिनी । हेमरत्नें पूजिती. ॥ १७५ ॥ राजा प्रवेशला नगरीं । गगन गर्जे मंगळतुरीं. । साखरा वांटिती परस्परीं । नारी नर संतोषीं. ॥ १७६ ॥ उत्तर गोग्रहण भारतीं । निरोपिलें ऐसिया रीती, । कौरव प्र[6]णुनी अपकीर्ती । जाते झाले स्वस्थळा. ॥ १७७ ॥ भारत इ[7]क्षुदंड सुरस, । मू[8]ळवाढियां सारिखा रस, । अठरा कांडोरीं गुणविशेष । गोडियेचा आगळा. ॥ १७८ ॥ त्यामाजीं चतुरार्थ[9] कांडोरें, । ह[10]स्तघाणां मुक्तेश्वरें । रस काढोनी श्रवणद्वारें । प्राशविला श्रोतेयां. ॥ १७९ ॥ तो सुस्वाद चाखतां मनें । प्रेम उपजे जीवें प्राणें, । नूतनपद्मिणी[11]-अंगने । कामिक[12] लोभे[13] ज्यापरी. ॥ १८० ॥ इति श्री**उत्तरगोग्रहण**समाप्ती, । पुढें **अभिमन्युविवाह**स्थिती । ते कृपेकरूनि श्रोतीं । श्रवण कीजे आदरें. ॥ १८१ ॥

---

## अध्याय सातवा.

भग्न होवोनियां **कौरव** । हस्तनापुरा चालिले सर्व, । हाव धांव वी[14]टीव गर्व । भग्न झाला संग्रामीं. ॥ १ ॥ संगीं[15] अवमान आणि खेदु, । शोक संताप, आणि विषा[16]दु, । पश्चात्तापें[17] सकळ बाधु । येया[18] अवसरा पावले. ॥ २ ॥ नेत्रीं ढळती अश्रुपात । दुःखें कपाळ पिटी हातें, । दुर्योधन **भीष्मा**प्रती । हृदयअवस्था नि-

---

१. सर्व सृष्टीचा संहार होईल; मोठें रण माजेल. २. 'गुप्त प्रकट खेळ दृष्टी' असें पाठांतर आहे. ३. या भाषणाचाही अभिप्राय मला कळत नाहीं. ४. विराटाला उत्तरानें डोळ्यांची खूण केली. ५. आरती. ६. परिणोनी, स्वीकारून. परिणय म्हणंजे विवाह, स्त्रीस्वीकार, हा मूळचा अर्थ. त्यावरून अपकीर्तीशीं विवाह करून. ७. ऊस. ८. मुळांत आणि शेवटच्या वाढ्यांत सारख्या गोडीचा रस आहे. ९. चवथें कांडें, विराटपर्व. १०. हातघाण्यामध्यें, चरकामध्यें. ११. पद्मिनीनामक जातीच्या तरुण स्त्रीला. १२. कामी मनुष्य. १३. लोभ धरितो. १४. पराक्रम. १५. त्याच्या संगतीला. १६. त्रास. १७. पश्चात्तापासहित. १८. ज्या समयीं.

रोपी. ॥ ३ ॥ म्हणे, 'स्वामी [1]तातताता! । हस्तनापुरा जाई आतां, । प्राण त्यागून तत्वता । मी स्वर्गलोका जातसें. ॥ ४ ॥ [2]पांडवहस्तीं गेला मान, । सर्व सेना केली नग्न, । याही परतें मातें मरण । कोणतें सांग विशेष? ॥ ५ ॥ पांडव मारुनी जीविजे [3]प्राणें । पांडव देखतां जाइजे [4]मरणें, । पांडव जिते असतां जिणें । अवमानाचें जळो तें. ॥ ६ ॥ भीष्म म्हणे, 'विचारश्रेष्ठा ! । यश अपेश शूराचा वांटा, । [5]नें कळत पात्र होती कष्टा । दुरभिमानी तुजऐसे. ॥ ७ ॥ ईश्वरइच्छेनें घडे सकळ, । वाउगी मनाची तळमळ, । अज्ञानाचें हेंचि फळ । सुखदुःखें [6]प्रलपिजे. ॥ ८ ॥ [7]द्यूतयुद्ध खेळतां बळें । जयापजय दोन्ही फळें, । [8]कृषी [9]वाणिज्य करितां न टळे । लाभ हानी दोंमाजी. ॥ ९ ॥ [10]कर्मदेह धरिला जेणें । तो [11]आंवतिला जन्ममरणें, । [12]चिंताधीन त्या दंडणें । शोक मोह सुबद्ध. ॥ १० ॥ देह धरूनी [13]क्षत्रवर्णी । आपणा लाभ [14]परांव्या हाणी, । इच्छुनी प्रवर्तल्या यत्नीं । [15]एकें लाधे प्रारब्धें. ॥ ११ ॥ काळाकाळ अपेश यश । घडती [16]जांवळेफळा ऐसें, । नसतें प्राणिया भासे पिसें. । सुखदुःखें पाविजे. ॥ १२ ॥ वेष्टुनि [17]पांचभौतिक चर्में, । जीव कोंडिला [18]त्रिविधकर्में, । त्यासी देह ऐसिया नामें । देहाभिमानी मानिती. ॥ १३ ॥ कृमि मृत्तिका अथवा राख । शेखीं होउनी जाती देख, । [19]त्यां देहाभिमानी मूर्ख । मी मी ऐसें [20]मानिती. ॥ १४ ॥ ईश्वरप्रभूचिये घरीं । प्रारब्ध नेमिलें [21]लेखांकरीं, । काळ [22]कृषीवळ निर्धारीं । देववील तयातें. ॥ १५ ॥ येथें आपुला उपाय यत्न । सहसा करूं न शके [23]आन, । हरिहरदेवांचीही क्षीण । शक्ती येथें भासती. ॥ १६ ॥ जें जें घडे जियेकाळीं । तें तें [24]मौनें घेइजे मौळीं, । भोगविते तिघे बळी । **काळ कर्म ईश्वरु.** ॥ १७ ॥ जरी परिहार असता कर्मा । तरी कष्ट नव्हते **नैषधरामा**, । आतां पावोनी [25]उपशमा । चित्त राखें सुविचारीं.' ॥ १८ ॥ यापरी बोधोनी [26]राजकुमरा । घेउनी पातला हस्त-

---

१. आजोबा. २. पांडवांच्या हातून. ३. जिवंत राहावें. ४. मरून जावें. ५. न जाणतां, अज्ञानामुळें. ६. बडबड करणें. ७. द्यूत आणि युद्ध. ८. शेती. ९. व्यापारधंदा. १०. कर्मे आचरिणारा देह, म्हणजे हा रक्तमांसांचा देह. लिंगदेहाहून वेगळा. ११. त्याला आमंत्रण केलें आहे. १२. जो काळजीच्या स्वाधीन. १३. क्षत्रिय जातीमध्यें. १४. पराला, शत्रूला. १५. लाभ आणिं हानि या दोहोंतून एक. १६. जुळ्या फळाप्रमाणें. १७. पंचभूतांचीं बनलेलीं. १८. सत्व, रज; तम, या तिहींनीं युक्त. १९. त्या देहाला. २०. मानितात. २१. लेखकानें. २२. शेतकरी. एथें 'काळाकाळीं' असाही पाठ आहे. २३. अन्य, वेगळें. २४. मस्तकीं. २५. मनाची शांतता. २६. दुर्योधनाला.

नापुरा । नमस्कारिलें [1]राजेश्वरा । [2]प्रज्ञाचक्षूजनकातें. ॥१९॥ [3]पहिलें, विदुराचेनि मुखें । वृत्तांत पुशिला [4]कुरुनायकें । तो हृदयीं रक्षूनि विवेकें । [5]आत्मजाशीं बोलतू. ॥२०॥ धृतराष्ट्र म्हणे, 'दुर्योधना ! । घडलें कांहीं नाठवीं मना. । विचित्र प्रारब्धाची रचना । कोणा नवचे लोटलिया. ॥ २१ ॥ कुबुद्धी देउनी [6]करवी पापें, । करवुनि जाळी पश्चात्तापें, । जाणतयाचाही [7]हारपे । सर्व विवेक ते काळीं. ॥२२॥ विवेक आणी सुविचारू । ईश्वरें नेमुनी दिधले गुरू, । त्यांचिया बुद्धी वर्ततां नरू । [8]आघातातें [9]नपविजे. ॥ २३ ॥ [10]यांची केलिया [11]अवज्ञा । दुःख भोगील [12]महाप्राज्ञा ! । जाणते जाणती संज्ञा । दुराग्रही नेणती. ॥ २४ ॥ वडीलवृद्धांचें वचन पाळी, । नीती न सांडी आपत्काळीं, । विजयलक्ष्मी त्यातें कवळी । कल्पांतींही सोडीना. ॥ २५ ॥ हरिगुरुसज्जनाची करी निंदा, । आग्रह विषाद [13]न संडी कदा, । त्यातें [14]पद्मनाभाची [15]प्रमदा । त्यागूनि जाय तत्काळीं. ॥ २६ ॥ कोणा [16]नकळतां जें करणें, । श्रेष्ठीं [17]वर्जितां [18]राहाटणें, । त्याचें फळ हें ऐसें जाणें । जें पातलें प्रचीती. ॥ २७ ॥ आतां असो बहुसाल युक्ती. । पुढें बोधिलें धरीं का चित्तीं. । भीष्मद्रोणविदुर सुमती । सांगती तैसें वर्तावें.' ॥ २८ ॥ दुर्योधन म्हणे, 'झाली कार्यसिद्धी, । आम्ही गेलों [19]पांडवशुद्धी, । [20]नव्हतां [21]नष्टचर्याची अवधी । [22]गोचर झाले आमुतें. ॥२९॥ अपूर्ण दिवसीं झाले प्रगट, । नेमा चुकले स्वधर्मभ्रष्ट, । आतां विभाग मागतां कष्ट । पावतील अपाडें. ॥३०॥ ज्यालागीं आम्हीं केलें गमन, । तें साधिलें निज कारण; । स्वल्प कांहीं घडलें व्यसन । तें सहज कर्म क्षत्रियां. ॥३१॥ आतां [23]प्रज्ञावंत सुमती । दूत धाडिजे विराटाप्रती, । त्याचेनि साक्षी मागुती । अरण्यवासा दवडावे. ॥ ३२ ॥ लोटली अष्टमासांची सीमा, । [24]चौत्वार मास उरले नेमा, । यालागीं तेरा वर्षें आम्हां । अवकाश झाला मागुतीं.' ॥ ३३ ॥ ऐसे कौरव विचारीं पडले । तंव विराटनगरीं काय झालें, । पांडवचरित्र जें वर्तलें । तें तूं परिसें [25]कुरुवर्या ! ॥ ३४ ॥ युद्ध करूनि आलिये राती । पांचही

---

१. महाराजाला. (धृतराष्ट्राला.) २. प्रज्ञा म्ह० बुद्धि हेच चक्षु म्ह० नेत्र ज्याचे; अर्थात् अंध. प्रज्ञाचक्षु असून पिता, त्याला. ३. प्रथमतः. ४. धृतराष्ट्रानें. ५. पुत्राला. ६. 'प्रारब्ध' हा कर्ता. ७. नाहींसा होतो. ८. पीडेला, धक्क्याला. ९. न पावावें, पावत नाहीं. १०. विवेक आणि सुविचार यांची. ११. न मानणें. १२. महाबुद्धिमंता. १३. न सांडी. १४. विष्णूची. १५. स्त्री. (लक्ष्मी.) १६. न विचारितां. १७. श्रेष्ठांनीं नको म्हटलें असतां. १८. वागणें. १९. पांडवांच्या शोधास्तव. २०. न होतां. २१. बारा वर्षें वनवास, आणि एक वर्ष अज्ञातवास, याप्रमाणें तेरा वर्षेंपर्यंत दुःखस्थितींत वागणें, त्याची सीमा. २२. ज्ञात, अनुभूत. २३. बुद्धिमंत. २४. चार. २५. जनमेजया. वैशंपायन जनमेजयाला सांगतो.

बैसले एकांतीं । निकट द्रौपदी महासती । संवादती[1] तें ऐका. ॥ ३५ ॥ अर्जुन म्हणे, 'झुंजतां समरीं । वैरिया ओळखी झाली पुरी, । पांडव असती विराटनगरीं । जाणवेल समस्तां. ॥ ३६ ॥ चारी[2] मास असती उणे । तें छिद्र पाहोनि दुर्योधनें । नेमा चुकले म्हणोनी वचनें । शब्द रूढवील लौकिकीं. ॥ ३७ ॥ विराटापासीं धाडील दूत । धर्म येथें बंधूसहित । ते वेळीं प्रगट होईल मात । जाणवेल समस्तां. ॥ ३८ ॥ यालागीं आम्ही प्रकटदृष्टी । जावें विराटाचिये भेटी । त्याचेनि संवादें मग राहाटी । घडे तैसी करीतसों. ॥३९॥ 'प्रगट झाले अष्टमासां' । शब्द गाजवितील ऐसा । त्यातें प्रत्योत्तर नरेशा ! । असे तें आम्ही जाणतसों. ॥ ४० ॥ द्वादशवर्षीं चारी मास । अधिक वाढती विशेष । अष्टमास मिळोनि वर्ष । नष्टचर्य लोटलें. ॥ ४१ ॥ आतां, 'अर्ध राज्य देणें, । न देतां सर्वही जाल प्राणें,' । ऐसें सांगोनी पाठवणें । दुर्योधनाकर्णातें. ॥ ४२ ॥ अंधासी पाठवावी विनंती, । 'पुत्र वांचवावयाची आर्ती । तरी उपदेशुनी बरव्या रीती, । राज्यभाग देववणें.' ॥ ४३ ॥ प्रातःकाळीं करूनी स्नानें, । गंधाक्षता धौत वसनें[3], । राजभद्रीं[4] येउनी मानें । आरूढले[5] निःशंक. ॥ ४४ ॥ राज्यासनीं धर्मराज । पुढें उभे चौघे अनुज[6] । पाठीसीं उभी ठेली भाज[7] । याज्ञसेनी[8] सुपवित्रा. ॥ ४५ ॥ राज्यासनीं देखोनी धर्मराजु, । सेवक म्हणती, 'राजाधिराजु । राज्यासन सोडोनी उजु । यथाक्रमें बैसिजे?' ॥४६॥ ऐकोनि तें दूतवचन । भीम म्हणे, 'धरा मौन्य, । कैसें होईल वर्तमान । चोज[9] नावेक विलोका.' ॥ ४७ ॥ दूत सांगती राजयातें, । 'कंकादिक निर्भयचित्तें । भद्रपीठीं बैसले त्यांतें । वारितां ते नायकती. ॥ ४८ ॥ निग्रंह[10] करावा केवळ । तरी अद्भुत बल्लवाचें बळ । ग्रंथिक आणि तंतिपाळ । सिद्ध असती सन्मुख. ॥ ४९ ॥ अंगनावेषाची गवसणी[11] । फेडून, तेजें प्रतापतरणी[12] । तैसा क्षत्रियांमाजी शिरोमणी[13] । बृहन्नळा जवळिके. ॥ ५० ॥ अवलोकिती सिंहदृष्टी[14] । आम्हां नकरवे त्यांसी गोष्टी, । राज्य घेती ऐसी पोटीं । शंका वाटे आमुच्या.' ॥ ५१ ॥ राजा म्हणे, 'धरा मौन्या । मीचि येतसें सभास्थाना.' । उत्तर म्हणे,

---

१. संवाद करितात. २. कित्येक पुस्तकांमध्यें ही ओवी नाहीं. कित्येकांमध्यें ही आणि पुढील अशा दोन्ही ओव्या नाहींत. ३. वस्त्रें. ४. सिंहासनीं. ५. चढून बसले. ६. भ्राते. ७. बायको, द्रौपदी. ८. द्रौपदी. ९. आश्चर्य, कौतुक. १०. वंदी. ११. वेष्टण, बुरखा. १२. तेजाचा सूर्य, सूर्यासारखा तेजस्वी. १३. मस्तकावरील रत्न, श्रेष्ठ. १४. सिंहासारखे तीव्रदृष्टी.

'राया![1]संज्ञा । अजून तरी जाण पां. ॥९२॥ युद्धीं पार्थे[2] वारिलें मातें, । म्हणोनी[3] रहस्य चोरिलें तूतें. । कंक तो धर्मराज निरुतें । ओळख आतां सुजाणा! ॥ ९३ ॥ बल्लव तोची भीमसेन, । बृहन्नळा तोची अर्जुन, । ग्रंथिक तोची नकुळ जाण, । तंतिपाळ सहदेव, ॥ ९४ ॥ सैरंध्री ते याज्ञसेनी, । द्रुपदरायाची[6] नंदिनी, । आतां साष्टांग लोटांगणीं । शरण जाईं पांडवां. ॥ ९५ ॥ घडलिया अनुचितकर्मा । नमस्कारें करविजे क्षमा, । 'करुणा करीं राया धर्मा, । अपराध कांहीं नाठवीं.' ॥ ९६ ॥ आंगें जिंकोनी संग्राम । मिथ्या रूढविलें माझें नाम । तुवां स्तवन करितां परम । मरणातुल्य मज वाटे.' ॥ ९७ ॥ ऐकोनियां पुत्रवचना । अति विस्मयो रायाचिये मना, । सत्वर उठिला सभास्थाना । पावता झाला तत्काळीं. ॥ ९८ ॥ वस्त्राभरणें सुवर्णपात्रीं । सहवर्तमान सुहृदमंत्री । पांडव अवलोकोनी नेत्रीं । लोटांगण घातलें. ॥ ९९ ॥ मस्तक ठेवूनी धर्माचे चरणीं । म्हणे, 'मी अपराधांची खाणी, । दयासमुद्रा! कृपा करूनी । क्षमा करीं मज दीना. ॥६०॥ नकळतां प्राणी आचरे दोष । ते क्षमा करी जैसा ईश, । तेंवी मी दासानुदास । उपसाहिजे[10] स्वामिया! ॥ ६१ ॥ सेवकवृत्ती घेतली सेवा, । हे[11] अभाग्यामाजी अभाग्य देवा! । कल्पतरू पातलिया खेंवां[12], । जेंवी हातें लोटिजे. ॥ ६२ ॥ पायें स्पर्शिलें ज्योतिर्लिंग, । कामधेनुतें ताडिलें डांग[13], । गरुड पातल्या मानुनी काग । पाषाणघातें दवडिला. ॥ ६३ ॥ चिंतामणीची[14] पायरी कीजे । परीस[15] नेणतां गोफणीजे[16], । मूर्खपणीं ऐसीं काजें[17] । अपार घडती प्राणिया. ॥ ६४ ॥ कीचकें करितां दुष्ट करणी । वर्जिलें नाहीं त्यालागोनी, । पांचाळीतें उदास वचनीं । वदली कांहीं सुधेष्णा. ॥ ६५ ॥ ऐशा अपराधांच्या कोटी । समुद्र होवोनी साठवीं पोटीं, । बाळक मानुनी कृपादृष्टी । मातें आतां विलोकीं.' ॥ ६६ ॥ धर्में करूनि प्रत्युत्थान[18] । आवडी दिधलें आलिंगन. । म्हणे, 'तूं मातें परम मान्य । भीष्मविदुरासारिखा. ॥ ६७ ॥ नष्टचर्य [19]भीष्म काळ । तुझिये छाये

१. खूण. २. निवारिलें. ३. गुह्यगोष्ट. ४. सत्यत्वें. ५. सुज्ञा. ६. कन्या. ७. त्यांना सेवकांप्रमाणें आपण वागविलें, या अयोग्य कृत्यास्तव. ८. असें म्हणून क्षमा माग. ९. अर्जुनानें स्वतः युद्ध जिंकून माझें नांव खोटेंच प्रसिद्ध केलें; म्हणजे म्यां युद्धांत जय मिळविला, असें लोकांना कळविलें. १०. सहन करावें. ११. 'हे अनुचित माजिया जिवा' असाही पाठ आहे. १२. आलिंगनाला. १३. अरण्यामध्यें. १४. चिंतित पदार्थ देणारा मणी. १५. स्पर्शानें लोखंडाचें सोनें करणारा पाषाण. १६. गोफणीनें फेकणें. १७. कार्यें. १८. उत्थापन देऊन. १९. भयंकर.

सुशीतळ । क्रमिला आणि बहुसांभाळ । क्षणक्षणां तुवां केला. ॥ ६८ ॥ अन्नें वसनें धनें मानें । संरक्षिलें जीवें प्राणें, । तुझे उपकार विसरिजे मनें । हें या-जन्मीं घडेना. ॥ ६९ ॥ जन्मोनि जेणें प्रतिपाळिला, । दिव्यमंत्रें उपदेशिला, । शिरच्छेदनीं सोडविला । वांचविला, दुर्भिक्षीं. ॥ ७० ॥ नौका बुडतां लावी [1]कासे, । जळतां रक्षी [2]हुताशें, । हे साही पितया ऐसे । मन्वादिक बोलती. ॥७१॥ यांतें विसरे जो तो पातकी । कोटीकुळेंशीं बुडे नरकीं.' । विराटें ऐकोनी मस्तकीं । [3]द्वादश चरण वंदिले. ॥ ७२ ॥ स्वहस्तें [4]प्रक्षाळुनि चरण । भाळीं चर्चिला हरिचंदन, । कुंकुम कस्तूरी सुगंध चर्चुन । [5]परिमळद्रव्यें आर्पिलीं.॥७३॥ चंपक मालती तुळसीमाळा । धूप दीप सुगंध वाळा । पीतांबर [6]मुक्ताफळा । पल्लवांकित नेसविले. ॥ ७४ ॥ किरीट कुंडलें पदकमाळा । [7]करमुद्रिका [8]कटि-मेखळा । अर्पोनी पांचही नृपाळा । [9]मत्स्यरायें पूजिलें. ॥ ७५ ॥ [10]परिधान करोनी पीतांबर । द्वादश आंगीं अळंकार । लेववूनी नमस्कार । सुधेष्णा करी [11]कृष्णेतें. ॥ ७६ ॥ पंक्ती सारोनी सुखभोजनें । त्रयोदशगुणी तांबूलपर्णें । अश्व पताका [12]रहंवर यानें । शत एक एकातें. ॥ ७७ ॥ विशाळ कुंजर मदोन्मत्त । वस्त्राभरणीं घंटायुक्त । पांचांजणा पांचशत । चारी सेवक एक एका. ॥ ७८ ॥ जीं आगळीं वळसंपन्नें । पांचशत अश्वरत्नें । आभरणें उत्साहमनें । पांडवांतें अर्पिलीं. ॥ ७९ ॥ सहस्र धेनू सहस्र महिषी । सहस्र सेवक सहस्र दासी । [13]नियुतसंख्या द्रव्यराशी । पादपूजा एकएका. ॥ ८० ॥ अर्पूनियां सहस्र ग्राम । वस्ती ओपिलें विशाळ धाम, । एके गृहीं सुखविश्राम । भिन्न भिन्न पांचांतें. ॥८१॥ भरोनी सर्वही संपत्ती । द्रौपदीसहित करविली वस्ती, । [14]उत्तर आणी नृपती । क्षणक्षणा [15]वोळंगती. ॥ ८२ ॥ लोटलेया अवदशेची सीमा । सन्मुख भेटूं येतसे पद्मा । तियेकाळींचे सुखसंभ्रमा । भाग्यभोक्ते जाणती. ॥ ८३ ॥ विराट बोले [16]सुहृदाचारी, । 'आतां कौरव आमुचे वैरी । धार्तराष्ट्रा सहपरिवारीं । [17]निर्दाळीन प्रतापें. ॥८४॥ धृतराष्ट्राचिया उत्तरकार्या । उरों नेदीं एकही तनया; । तेंही कर्म धर्मराया । करणें घडे तें करूं. ॥ ८५ ॥ स्वामीनीं स्वामित्व भो-

---

१. कांठास पोंचवी. २. अग्नीनें. ३. पांच पांडव आणि सहावी द्रौपदी यांचे. ४. धुवून. ५. सुगंध द्रव्यें. ६. मोत्यांच्या पदरांनीं युक्त. ७. हाताच्या आंगठ्या. ८. कंबरपट्टा. ९. विराटानें. १०. नेसून. ११. द्रौपदीला. १२. रथ. १३. दहा हजार. १४. 'विराटराजा जोडलिया हस्तीं, क्षणक्षणा वोळगे' असाही पाठ आहे. १५. सेवेसाठीं सिद्ध असती. १६. मित्रत्वानें वागणारा. १७. समूळ नाश करीन.

गोनी असणें, । सेवका हातीं सेवा घेणें, । शत्रु निवटूनी स्थापणें । राज्यासनीं धर्मातें. ॥ ८६ ॥ जळो भीष्माचें वडिलपण । सभेशीं करितां वस्त्रहरण । वर्जू न शके, प्राणहीन । यालागीं प्रेत सहजचि तो. ॥ ८७ ॥ द्रोण तो केवळ पर्णद्रोण[1] । आयुष्यआज्यें[2] माखला पूर्ण, । हातें स्पर्शतां धृष्टद्युम्नें[3] । रणीं पडेल पालथा. ॥ ८८ ॥ खंडिल्या कर्णेशिं विकर्ण । कौरवसेना अवलक्षण, । प्राणें गेलिया दुर्योधन । मग विरूप अपवित्रा. ॥ ८९ ॥ काढा शैल्याचें[4] सालडें, । शकुनी उडवूं शैकुनीपाडें,[5] । दुःशासनादि माकडें । स्वर्गझाडां वळघवूं'.॥९०॥ पांडव म्हणती, 'सुरपादपा[6]! । सर्वेही घडेल तुझिया कृपा, । ईश्वर वोळँलिया[7] संकल्पा । निर्फलता मग कैंची?' ॥९१॥ विराट करितसे विज्ञापना, । 'बहुकाळ उरलीसे वासना । ते त्वां कृपा करूनी दीना । अंगीकारिली पाहिजे. ॥ ९२ ॥ उत्तरा द्यावी अर्जुनातें । हा संकल्प बहुसाल मातें, । तें त्वां आपुलेनि हातें । सिद्धी पावविलें पाहिजे.' ॥९३॥ अर्जुन म्हणे, 'यथार्थ ऐक, । एक नघडोनि हें आणिक । विशेष दुणावे सोयरिक । ऐसें करीं निधारें. ॥ ९४ ॥ उत्तरा माझी शिष्यिणी खरी, । विद्या शिकविली ते कुमरी, । भार्या न करुनि सुंदरी । स्नुषा करीन आवडी. ॥ ९५ ॥ कृष्णभगिनीसुभद्राकुमरू[8] । क्षात्रविद्यावधूचा वरू । धनुर्धरां दीक्षागुरू । पुत्र माझा अभिमन्यू. ॥ ९६ ॥ त्याची करीन हे अंगना । जेंवी कां रती योग्य मदना.' । विराट म्हणे, 'माझिया मना । बहुप्रकारें मानलें. ॥९७॥ पाँलाणुनी[10] रथ कुंजर । द्वारके धाडावे सत्वर, । सुभद्रेशीं यादवेश्वर । शीघ्र येथें आणावे. ॥ ९८ ॥ पत्रीं विनवा श्रीपती, । 'खंडली अज्ञातवास राती । तुझिया कृपेचा गभस्ती[11] । उदया आला स्वभावें. ॥ ९९ ॥ कौरवें[12] कुविद्येचा अग्नी । पेटवोनी जाळिता आम्हालागोनी, । त्यासी वारिता तूं चक्रपाणी! । स्वामी अससी आमुतें. ॥ १०० ॥ आतां विराटें आपली दुहिता । उत्तरा नेमिली सुभद्रासुता । यालागीं घेउनी समस्तां । शीघ्र आलें पाहिजे.' ॥ १०१॥ आतां अभिमन्युविवाहो । वैशंपायन वदेल पाहा हो! । जैसा गौतमीप्रवाहो । क्षेत्र लंघीत चालिला. ॥ १०२ ॥ व्यास सद्गुरू पुढारा । पाठीं चाले मुक्ते-

---

१. पानांचा द्रोण. २. तुपानें. ३. द्रुपदराजाचा पुत्र आणि द्रौपदीचा भ्राता, त्यानें. ४. कर्णाचा सारथी. ५. पक्ष्यासारिखा. ६. हे कल्पवृक्षा! ७. वळल्यास. ८. कृष्णाची बहीण सुभद्रा, तिचा पुत्र. ९. 'क्षात्रविद्ये परम शूरू' असाही पाठ आहे. १०. सिद्ध करून. ११. सूर्य. १२. 'कौरव कुविद्येचा धूम । पेटवूनी म्हणती आहे तम ।' असाही पाठ आहे. कित्येक पोथ्यांमध्यें ही ओवीच आढळत नाहीं.

शगिरा, । पाय पडतां आडमोहरा । संत सुपथें लाविती. ॥ १०३ ॥ इति श्री-विराटपर्वणि भारत । पुढें परिसिजे सावचित्त । लग्ना येईल कृष्णनाथ । तें श्रवणनयनीं विलोका. ॥ १०४ ॥

---

## अध्याय आठवा.

'अभिमन्यू झालिया जामात । सोयरा जोडला कृष्णनाथ', । विराट म्हणे, 'अत्यद्भुत । भाग्य माझें त्रिलोकीं.' ॥ १ ॥ सहस्रसंख्या कनकरथ । ध्वज पताका सुशोभित । सहस्र करी मदोन्मत्त । चवरडोल[1] त्यांपृष्टीं. ॥ २ ॥ सहस्रसंख्या शिबिकायानें[2] । सहस्र छत्रें चंद्रवर्णें । दोनी सहस्र अश्वरत्नें । हेमाभरणें[3] शोभती. ॥ ३ ॥ पांचसहस्र पायिचे[4] वीर । सहस्र ब्राह्मण थोर थोर । आदरें विराट[5] राजेश्वर । मूळ धाडी द्वारके. ॥ ४ ॥ कुंजरभेरींची गर्जना । करित पातले हरिपाटणा[6]. । दूत करिती विचारणा, । 'कोण कोठील कवणाचे ?' ॥ ५ ॥ 'अभिमन्यूच्या विवाहकार्या । मूळ पातलों श्रीकृष्णराया, । विराटें लागोनियां पाया । विज्ञापना पाठविली. ॥ ६ ॥ अज्ञातवासाचा विटाळ । क्षाळूनि पांचही कुंतीबाळ । कृष्णदर्शना उतावीळ । परमार्थी[7] बैसले.' ॥ ७ ॥ वार्ता जाणवितां दूतीं । आनंदला आनंदमूर्ती[8], । मानें पाचारुनी[9] वस्ती । चित्रशाळे दीधली. ॥ ८ ॥ सर्वेही येऊनि सन्मुखी । जयजयकार करिती मुखीं । भूमी स्पर्शोनी मस्तकीं । लोटांगणें घातलीं. ॥ ९ ॥ पुढें होऊनि पुरोहितीं । कुंकुममंडित अक्षरपंक्ती । पत्रिका निवेदिली हातीं । विश्वंजनकजनकाचे[10]. ॥ १० ॥ पत्रीं चित्रिलें[11] चक्रपाणी, । विराटें मस्तक ठेविला चरणीं । प्रार्थना करी बद्धपाणी[12] । लग्ना यावें म्हणोनियां. ॥ ११ ॥ धर्मादि पांचही मूर्तीं । पुढें रेखिल्या जोडिल्या हस्तीं । तें देखोनी लक्ष्मीपती । हास्य करी विनोदें. ॥ १२ ॥ तळीं[13] अभिप्राय सकळ । अक्षरीं गुंफिला अर्थ विमळ । जैसें पुष्प आणी परिमळ । द्वैतभाव नेणती. ॥ १३ ॥ 'विश्वंभरा विश्वेश्वरा । विश्वोदरा विश्वोद्धारा । विश्वविग्रहा साचारा । विश्वोद्भवा श्रीकृष्णा ! ॥ १४ ॥ तुवां प्रेरलिया बीजें । चराचरा पातलें सहजें, । तुज वेगळें आन दुजें । नाहीं नाहीं त्रिलोकीं. ॥ १५ ॥ उत्तरा विराटाची कुमरी । अभिमन्या नेमिली नोवरी । ते तूं येऊनी आपले

---

१. हत्तीवरील अंबारी. २ पालख्या. ३. सुवर्णालंकारांनीं. ४. पायदळ. ५. आमंत्रण. ६. द्वारकेला. ७. सत्यत्वेंकरून. ८. श्रीकृष्ण. ९ आदरातिथ्य करून. १० ब्रह्याच्या पित्याच्या हातीं. ११. चित्र काढिलें. १२. हात बांधून. १३. बुडाशीं.

करीं । संकल्पसिद्धी करावी. ॥ १६ ॥ प्रार्थूनियां बळिभद्रातें । मानें आणिलें पाहिजे येथें । गद सारण चक्रदेवातें । समागमें आणिजे. ॥ १७ ॥ सात्यकी कृतवर्मा अक्रूर । प्रद्युम्न सांबादि कुमर । उद्धव भक्तराज थोर । प्रार्थूनियां आणावे. ॥ १८ ॥ वैदर्भकन्या सत्राजिती । वृंदा भद्रा नग्नजिती । लक्ष्मणा काळिंदी जांबवती । शिविकारूढ आणाव्या. ॥ १९ ॥ सुभद्रेतें मान थोरू । करावया तुजचि अधिकारू । गजस्कंधीं अभिमन्युवीरू । शृंगारुनी आणावा. ॥ २० ॥ अज्ञातवासाचें मळीन वास[1] । त्यागून शुभकाळसुवास[2] । वेढूनि पांडव पंच पुरुष । तव दर्शना भुकेले. ॥ २१ ॥ आपुलेनि दर्शनामृतें । तृप्त केलें पाहिजे त्यांतें.' । पत्रिका वाचितां श्रीकृष्णचित्त । उतावीळ प्रयाणा.[3] ॥ २२ ॥ दारुकातें[4] आज्ञा करी, । रथ संजोगी झडकरी[5] । एकअक्षौहिणीदळभारीं । कृतवर्मा[6] सिद्ध झाला. ॥२३॥ घेउनी अक्षौहिणीदळ, । सात्यकी[7] सिद्ध झाला प्रबळ, । इंद्रसेनादि आप्त सकळ । रथारूढ निघाले. ॥२४॥ वंदून वसुदेव[8] उग्रसेन[9] । म्हणे, 'रक्षावें निज पट्टण.' । इतर यादवांशीं श्रीकृष्ण । विराटपुरा पातले. ॥ २५ ॥ काशिराज शल्य नृपती । अक्षौहिणीदळसंपत्ती । घेउनी श्रीकृष्णासंगतीं । विराटपुरा चालिले. ॥ २६ ॥ भूतलीं पसरे सिंधुजळ । तेंवी दोन अक्षौहिणीदळ, । श्वेत चामरें छत्रें धवळ । जेंवी कल्होळ लहरींचे. ॥ २७ ॥ द्रौपदीचे पंच कुमर, । शिखंडी[10] धृष्टद्युम्न वीर । घेउनी पांचालराजेश्वर[11] । विवाहकार्या चालिले. ॥ २८ ॥ सुवर्णरत्नाचिया कोटी । वस्त्राभरणें कुंजरपृष्ठीं[12] । घेऊनि पांडवाचे भेटी । श्वशुर[13] स्नेहें पातला. ॥ २९ ॥ दासी दास रथ कुंजर । अमूल्य वारु साळंकार । धेनू महिषी वृषभ थोर । धर्मालागीं आणिले. ॥ ३० ॥ वसुदेव हलायुध[14] । प्रद्युम्न[15] सांब गद । कृ-

---

१. वस्त्र. २. उत्तमकाळरूप उत्तमवस्त्र. ३. जाण्याकरितां. ४. कृष्णसारथी त्यातें. ५. सिद्ध करी. ६. बलरामाचा सेनाध्यक्ष. ७. एक शूर यादव. ८. कृष्णपिता. ९. कंसपिता उग्रसेन, मथुरेचा राजा. १०. हा द्रुपद राजाचा पुत्र. हा प्रथमतः कन्यारूप असून त्याला पित्यानें पुत्रवेषानें वाढविलें होतें. पुढें हिरण्यवर्मा नामक राजाच्या कन्येशीं त्याचा विवाह झाला. गुह्यगोष्ट प्रकट झाल्यामुळें, तिच्या पित्यानें युद्धार्थ आगमन केलें. तेव्हां वनामध्यें पळून जाऊन त्यानें एका यक्षाला प्रसन्न करून घेतलें, आणि त्याचें पुरुषत्व उसनें घेऊन त्याला आपलें स्त्रीत्व दिलें. पुढें आपल्या देशीं परत येऊन स्त्रीचा स्वीकार केला. तथापि मूळचा स्त्रीरूप असल्यामुळें भारती युद्धामध्यें भीष्माचार्य त्याच्याशीं लढला नाहीं. यामुळें भीष्माचा पाडाव झाला. ११. द्रुपद. १२. हत्तीच्या पाठीवर. १३. हा पांडवाचा श्वशुर स्नेहास्तव आला. १४. हल (नांगर) आहे आयुध ज्याचें, बलराम. १५. कृष्णपुत्र.

तवर्मादि प्रसिद्ध । सात्यकी श्रेष्ठ यदुकुळीं. ॥ ३१ ॥ सुभद्रा देवी शिबिका-यानीं । गजस्कंधीं अभिमन्यू गुणी । इंद्रसेन उद्धव ज्ञानी । अक्रूर भक्त त्या-जवळी. ॥ ३२ ॥ दाहासहस्र मत्त कुंजर । शत अयुतें अश्वस्वार । अर्बुदसंख्या रहंवर । निखर्वसंख्या पदाती. ॥ ३३ ॥ घेउनी आपुलालें दळ । कृष्णापाठीं चालिले सकळ, । मेघीं लोपिजे आभाळ । तेंवी भूतळ महावीरीं. ॥ ३४ ॥ गगनीं गर्जती [1]जळधर । तेंवी यादवांचे गजर, । शस्त्रें झाडिती महावीर । जेंवी विद्युल्लता तळपती. ॥ ३५ ॥ युयुधान आणि धृष्ट । वृष्णि अंधक भोजक निवट । घेऊनि सेनेचे [2]संघाट । कृष्णापाठीं चालिले. ॥ ३६ ॥ श्रीकृष्ण पातला विराटपुरा, । [3]मत्स्य धाविन्नला सामोरा, । सन्मानुनी [4]सर्वेश्वरा । [5]जानवसा आणिलें. ॥ ३७ ॥ अरुणरंगीं रंगलें गगन । तेंवी मंडप एक योजन, । [6]चंद्र-पुटीं नक्षत्रगण । तेंवी मुक्तें झळकती. ॥ ३८ ॥ तळीं टेंकी सुवर्णस्तंभ । जेंवी कनकमेरुचे कोंभ, । बैसका देखोनीया दंभ । इंद्रभुवनें सांडिला. ॥ ३९ ॥ आसनीं बैसवोनी सकळ । अर्पिलें चंदन तांबूल, । दिव्यसुमनाचा परिमळ । वेध लावी वसंता. ॥ ४० ॥ बंधुसहित पातला धर्म । आवडी कवळिला पु-रुषोत्तम, । पंचवोघांचा संगम । क्षीरार्णवीं ज्यापरी. ॥ ४१ ॥ श्रीकृष्ण अक्ष-यसुखाचा निधी । पांचही [7]मीनले सुखसंवादीं । तें सुख [8]अनुवादतां शब्दीं । अवाच्य जाण सर्वथा. ॥ ४२ ॥ अवलोकितां श्रीकृष्णमुख । अज्ञातवासाचें निरसिलें दुःख, । जेंवि उगवतांची अर्क । तम नासी ब्रह्मांडीं. ॥ ४३ ॥ द्रौपदी लागतां चरणीं । ब्रह्मानंद कोंदला मनीं । श्रीकृष्णें स्पर्शतां मूर्ध्नीं । देहभाव विसरली. ॥ ४४ ॥ वरनोवरीये क्षालन । मुहूर्तें हरिद्रालेपन । [10]देवक-प्रतिष्ठाविधान । उभयमंडपीं संभ्रमें. ॥ ४५ ॥ चहूंवेदींचे ऋषी ब्राह्मण । श्रेष्ठ वसिष्ठासमान, । उभयमंडपीं यजमान । श्रीकृष्णदेव समर्थ. ॥ ४६ ॥ फळें सेवती रुखवत, । [11]वर्धावा गेला [12]विराटसुत, । नोवरा आणिला मिरवत । लग्नमंडपा अभिमन्यु. ॥ ४७ ॥ पूजा [13]मधुपर्कविधान । दिव्य पीतांबरपरिधान, । रत्नाभरणें [14]सुमनें चंदन । कन्यादानीं आणिलीं. ॥ ४८ ॥ वस्त्रें झांकोनियां हस्तू । मोलें

---

१. मेघ. २. समुदाय. ३. विराट. ४. कृष्णाला. ५. जानोसा, पाहुण्यांना दिलेलें स्थळ. ६. 'सूर्यपुटीं' असें पाठांतर. ७. लागले, दृढ झाले. ८. पुनः उच्चारितां. ९. स्नान. १०. देवता-स्थापन. ११. वराला आणण्याला गेला. १२. उत्तर. १३. कोणी पूजाई मनुष्य घरीं आला असतां, त्याला दहीं आणि मध देण्याची जी चाल ती. मांस आणि मद्य यांचे हे प्रतिनिधि आहेत असें म्हणतात. १४. पुष्पें.

नेमुनी देती वस्तु । तेंवी अंतःपट शोभितु । नांदीयुक्त[1] जवळिके. ॥ ४९ ॥ चतुर्विधा[2] मंगळाष्टकें । उभयत्राहीं गर्जती मुखें । ॐपुण्या[3] होतां सुखें । प्रकृतिपुरुषा सुलग्न. ॥ ५० ॥ जेंवी रमेशीं रमारमण[4], । पार्वतीसीं त्रिनयन[5],। सावित्रीसीं कमळासन[6] । तेंवी अभिमन्यू उत्तरे. ॥ ५१ ॥ लोपामुद्रेसीं अगस्ती। वसिष्ठासी अरुंधती । प्रद्युम्न आणी देवी रती। तेंवी अभिमन्यू उत्तरे. ॥५२॥ चंद्रमा आणी रोहिणी, । छायाभगवती देव तरणी[7], । तेंवी अभिमन्यू उत्तरा दोन्ही । यथायोग्य शोभती. ॥ ५३ ॥ होमीं तोषविला हुताशन[8], । अभिषिंचनीं गौरीरमण[9] । जयजयकारें अमरगण[10] । पुष्पांजळी वर्षती. ॥ ५४ ॥ जे मंडपीं लक्ष्मीपती[11], । ऋद्धि[12] सिद्धी[13] वोळंगती । तेथील शोभा काय किती । वर्णूं न शके शारदा[14]. ॥ ५५ ॥ हळदीउटणें येरे[15] दिवशीं । आमंत्रणें सोइरे यांशीं । सर्वेच ऋषी राजे यांशीं । याचकांशीं बहुमानें. ॥ ५६ ॥ कनकताटें[16] एकपंक्ती । रत्नवाटिया ओपं[17] देती । हेमठाणवियावरी[18] दीप्ती । रत्नदीप शोभती. ॥ ५७ ॥ सूक्ष्म ओदनें[19] श्वेतवर्णी[20] । पहातां निवती जिव्हा नयनें, । चंद्र आणी वसंत दोन्ही । वर्णवासा वेधले. ॥ ५८ ॥ जया रुचे जें आवडे । तें तेणें सेविजे कोडें[21], । यालागीं पांच वरान्नें[22] गोडें । ओदनानिकटीं वाढिलीं. ॥५९॥ सेवया, सरळीया, मालतिया, । गव्हले, बोटवे, कुसुमकळिया, । बीजाकृती आळलीया । क्षीरसागर सुस्वादें. ॥६०॥ कोरवडे, कथिकावडे, । दधीवडे, मधुवडे, । चिंचवडे, निंबवडे, । रायवडे, अरुवार[23]. ॥ ६१ ॥ घृतें पाचिल्या घारिया, । सुरस श्वेत गुळवरिया, । साखरमांडे, पूरिया, । क्षीरसारोळ्या अरुवार[23]. ॥ ६२ ॥ तिळवे लाडू सेवयांचे । भिल्लातकी[24] चारबीजाचे । खसखसखोबरियाचे । फणसबीजांचे साजिरे. ॥ ६३ ॥ अक्रोड बदामफळबीजाचे । सुरस पद्मिणीकंदाचे । आर्त पुरवाया जिव्हेचें। गणेश झाला वऱ्हाडी. ॥ ६४ ॥ चणकपिष्टवडियांचे । स्वाद घेऊनी जिव्हा नाचे। नारळ साखर खजुरीचे । शुभ्रसोजीचे अरुवार. ॥ ६५ ॥ खाज्या, करंज्या, अनारसे, । फेणिया, घृतपूरिया,

---

१. मंगल. २. 'चतुर्विंशति' पाठांतर. ३. 'ॐपुण्याहम्=चांगला दिवस. सुमुहूर्त' असा उच्चार होतांच. ४. विष्णु. ५. शंकर. ६. ब्रह्मा. ७. सूर्य. ८. अग्नि. ९. शिव. १०. देवगण. ११. कृष्ण. १२. वृद्धिरूपिणी देवता. १३. सिद्धिरूपिणी देवता. १४. सरस्वती. १५. दुसऱ्या. १६. सुवर्णाचीं ताटें. १७. चकाकी. १८. सुवर्णाच्या स्थापित दीपांवर. (समयांवर.) १९. बारीक तांदळांचा भात. २०. शुभ्रवर्ण. २१. कौतुकानें. २२. पक्वान्नें. २३. हळवार, हलक्या. २४. बिब्याचे व चारोळ्यांचे.

पयरसे, । लुंचया, वडिया, बतासे, । शुद्धशर्करा निर्मळ. ॥ ६६ ॥ मुगवडिया, मुगधिरडीं, । भक्षितां सकुमारता गोडी, । वेटंण्या भक्षितां आवडी । मुखपालटाकारणें. ॥ ६७ ॥ वाळेकर्पूरसुवाशीं । उदक ओपिती हेमकलशीं, । भोजनीं भागले तयांशी । वांळविंझणे विंझिती. ॥ ६८ ॥ सर्व कर्मी ब्रह्मभावना । पूर्ण प्रतीती उपजे मना । तेंवी वरी वाढिती लेंवणा । अपूर्णता मग कैंची. ॥६९॥ घारगे, सांडगे, अमृतफळें, । अतिरस मनोहर रसें सकळें. । अधिकमाशीं महिमेआगळे । ते अंपूप वाढिले. ॥ ७० ॥ अरुवार सोजिया, फेणिया, । नौंबदचूर्णें कोंदलिया, । सपीट कानवले, पोळिया, । कर्दळीगर्भासारिख्या. ॥ ७१ ॥ वांगीं, तोंडलीं, पडवळें, । दोडके, कारलीं, भोपळे, । कोहळे, कांकडी, कोवळे । गोड वाळकें परिपाकीं. ॥७२॥ पत्रशाखा, चक्रवर्ती, । चाकवत, अळुशाख, नी मेथी, । कडोचीं कोमळें तळलीं घृतीं, । अती अरुवार काचरिया. ॥ ७३ ॥ बेलें, नेपती, आंवळे, । कांकडी, करवंदें, साळफळें, । भोकरें, मायणी, सेवगे, मुळें, । कोंभ कोंवळे वंशांचे. ॥ ७४ ॥ आंबे, आलें, निंबें सुरसें, । हळदी, कचोरिया सुवासें, । सुरण, मिरें, पिप्पलीघोसें, । कुंहरिया, आणी खरसिंगें. ॥ ७५ ॥ ऐसीं लोणचीं चाखतां ओठीं । अरुची पळे बारावाटीं, । जैसे धनवंतरियाचे दृष्टीं । रोग पळती दशदिशा. ॥ ७६ ॥ तिळवेलाडू, सेवयालाडू, । चारोळिया, गोडवियांचे लाडू, । खसखसफणसबीजाचे लाडू, । अक्रोडखर्जुरीबीजाचे. ॥ ७७ ॥ चणकपिष्टवडियाचे । अरुवारपणें जिव्हा नाचे, । घारगेपोळियामांडवियांचे । ग्रास घेतां पालटे. ॥ ७८ ॥ नवनीत साजूक संद्यस्तप्तें, । शब्दवाटिया उचंबळती घृतें, । एक शोधिलीं नवनीतें, । एक थिजलीं सुवासें. ॥ ७९ ॥ दधीसारें, दुग्धसारें, । पयं आटिलें तवक्षीरें, । परम भाग्याचे जेवणारे । जे जेविती तये पंक्ती. ॥ ८० ॥ गाळूनि चंद्रकळेचा रसू, । माजी मेळविला सुवासू, । ते कथिकेचा घेतां वासू । परतें म्हणती अमृता. ॥ ८१ ॥ समुद्रमंथनींचें अमृत । गोडी देउनी फिकें करित, । तेथिंच्या उदका न लावी हात । खारवणी म्हणोनी. ॥ ८२ ॥ तेंवी कामधेनूच्या तक्रें । कथिका सेविजे देवशक्रें, । अमृतातें म्हणती वक्रें । कळकटलें बहुकाळीं. ॥ ८३ ॥ तक्रतिथिनी, आमळकी, ।

---

१. चोखण्याचे पदार्थ. २. कोडबोळीं. ३. वाळ्याचे पंखे. ४. वारा घालतात. ५. मीठ. ६. अनारसे. ७. खडेसाखरेच्या चूर्णानें. ८. बेलफळें. ९. माइनमुळें. १०. वेळूचे. ११. कुहिन्या. १२. लोणकढें, ताजें. १३. तवकील. १४. ताकतई.

ओदन साजिरी वरि निकी, । आमटी, मेथकुटें, थोडकीं, । उपचार केले सुस्वादें. ॥ ८४ ॥ बदरी[1]कपित्थ[2]आम्रचूर्ण, । अंबसोलसालचूर्ण, । मिरे यांचें पित्तशमन । दक्ष जन सेविती. ॥ ८५ ॥ ऐशा नानाविध कथिका । भिन्नभिन्नपात्रीं भरिल्या देखा, । ज्या कां आस्वादतां मुखा । ओदन[3] चाले द्विगुणें[4]. ॥ ८६ ॥ नानाशाकारसांचीं सारें । ओदनासंगीं अत्यंत मधुरें, । जें सेवितां कुपथ्य वारें । कदाकाळीं बाधेना. ॥ ८७ ॥ सांडया, कुरवडिया, पापडे, । अळण[5] सांबारीं स्वादिष्ट गोडें । कोशिंबिरी, रायतीं, मिरगुंडें, । मेथकुटें मघमघिती. ॥ ८८ ॥ कृष्ण भोक्ता जिये पंक्ती । भोजन करी परमआर्ती, । तया पंक्तीकराचें किती । भाग्य मुखें वर्णावें ? ॥ ८९ ॥ आंबे रसाळ सुरस केळें, । पिकोन उललीं गंगाफळें, । पेंडाळु, रताळु गुळगुळे, । कपित्थें पक्कें मघमघिती. ॥ ९० ॥ ऐशिया फळांच्या शिकरणी । जेविल्या आली पूर्ण धणी[6], । शाखांचेनी सुवासें गगनीं । वेधु[7] उपजवी निर्जरां[8]. ॥ ९१ ॥ फळमूळशाखा, पत्रशाखा, । कंदशाखा, पुष्पशाखा, । त्यांचा स्वाद सेवितां मुखा । शाकांभरी[9] स्वयें आली. ॥ ९२ ॥ अरण्यशाकांचिया श्रेणी । दध्योदनाच्या[10] सांगातिणी । दधितक्रांचिये मेळणी । ब्रह्मानंद भोक्तयां. ॥ ९३ ॥ विराटभार्येची कुशळता । देखोनी चोज करिती वनिता[11], । यादवपांडवांचिया कांता । म्हणती धन्य सुजाणे. ॥ ९४ ॥ कृष्णपंक्तीचे जेविले जाणा । ते आंचवले[12] जन्ममरणा । कृष्णरंगीं रंगून वदना । श्रीकृष्णची झाले मानसें. ॥ ९५ ॥ त्रयोदशगुणें तांबूलें । वऱ्हाडी डवरिले[13] परिमळें, । वस्त्राभरणीं मत्स्यपाळें[14] । मेदिनीपाळ[15] पूजिले. ॥ ९६ ॥ मूळभारतीं वरिष्ठव्यासें । कथिलें सैंवरं[16] एकमासें, । तें येथें बोलतां सुमानसें । विक्कति श्रोते मानिती. ॥ ९७ ॥ म्हणोनी आच्छादिला ठावो, । सकळासहित कृष्णदेवो । जेवुनी धाला तो अनुभवो । स्वानुभवी जाणती. ॥ ९८ ॥ कुंकुम केशर कस्तूरिका । चंदनचूर्ण उधळिला बुका, । गुंफोनी मालती चंपककळिका । माळा सूदल्या[17] सर्वांतें. ॥ ९९ ॥ वाणपालटणें, रुसणें, प्रीती । मंडपा आणोनी पूजणें पुढती । वंशपात्रदान विध्युक्ती । कन्या हातीं निर्वणें[18]. ॥ १०० ॥ ग्रह-

१. बोर. २. कवीठ. ३. भात, अन्न. ४. दुप्पट. ५. चण्याचें पीठ पाण्यांत शिजवून मसाला घालून कोरडेशास पदार्थ करितात तें. ६. तृप्ति. ७. आवड. ८. देवां. ९. देवतेचें नांव. १०. दधि+ओदन=दहिंभाताच्या. ११. स्त्रिया. १२. मुक्त झाले. १३. सुवासानें भरले. १४. विराटानें. १५. पृथ्वीपति, धर्मराज. १६. स्वयंवर. १७. दिल्या. १८. हातीं देणें, स्वाधीन करणें.

प्रवेश, लक्ष्मीपूजन, । पूजितां लक्ष्मी बोले वचन, । 'त्रयोदश वर्षें भरतां कृष्ण । घेउनी आला मज संगें. ॥ १०१ ॥ आतां येथेंचि करणें वस्ती, । सहसा नवचें कोठें पुढतीं. । कौरवगृह टाकोनी सुमती । [1]धर्मधामा पातलें.' ॥ १०२ ॥ [2]घेंडा नाचवितां कौतुकें । हांसोनी श्रीकृष्ण बोले मुखें, । 'कुरुक्षेत्रीं रणभूमिके । घेंडा पुढें नाचवूं.' ॥ १०३ ॥ अर्जुन मुख्य करूनी पाहीं । चौघे गौरविले व्याही, । बुडविले [3]उँचिताचे डोहीं । जेंवी [4]मंदरा समुद्रीं. ॥ १०४ ॥ विराटरायाच्या कामिनी, । त्यांमाजी सुधेष्णा मुख्य राणी, । तेही पूजिली याज्ञसेनी, । [5]देवांगनीं जेंवि [6]गिरिजा. ॥ १०५ ॥ अपार [7]ओपिलीं वस्त्राभरणें, । मागील क्लेश विसरली मनें, । जैसी जागृती येतां नेणें । दुःख दरिद्र स्वप्नींचें. ॥ १०६ ॥ तैसींच ओपिलीं सुभद्रेतें । सुहृदनृपांच्या स्त्रियातें, । आणीक ऋषीअंगनांतें । गौरविलें सुधेष्णे. ॥ १०७ ॥ वेदपाठक ज्योतिषी [8]गणक । शास्त्री पंडित पुराणिक । गायक नृत्यक परिहासक । भांड कथक विनोदी. ॥ १०८ ॥ भाट नागरीक [9]मागध । [10]वैतालिक नानाविध, । ते दानीं पावोनी परमानंद । दरिद्रातें विसरले. ॥ १०९ ॥ सातसहस्र हेमाभरणी । [11]वारू ओपिले आंदणीं, । दानोदकें स्रवती श्रवणीं । मत्तकरी साजिरे. ॥ ११० ॥ पांचसहस्र मदोन्मत्त । आभरणें झुलीसहित । चारीसहस्र कनकरथ । अश्वयुक्त दीधले. ॥ १११ ॥ सहस्र दासी कुशळ कामीं । धेनू महिषी उष्ट्र [12]वामी । वस्त्रीं शस्त्रीं रत्नहेमीं । पांडव प्रीती पूजिले. ॥ ११२ ॥ झाला अभिमन्युविवाहो, । हर्षें विराट महाबाहो. । अवलोकोनी सुहृदसमूहो । लोटांगण घातलें. ॥ ११३ ॥ वृषभ धेनू आणि म्हैशी । सुवर्णरत्नांचिया राशी । [13]निवेदुनी पांडवांशीं । स्वल्प मानी विराटु. ॥ ११४ ॥ ऐसा एक वर्षवरी । उत्साह विराटाचे घरीं, । श्रीकृष्णदेव सहपरिवारीं । पांडवसंगीं तोषला. ॥ ११५ ॥ [14]संभ्रमें अभिमन्यूच्या लग्ना । अंगें [15]पातला [16]यादवराणा, । हें ऐकोनी दुर्योधना । हृदयस्फोट ओसरला. ॥ ११६ ॥ म्हणे, 'श्रीकृष्ण आणी विराट । सोइरे झाले वरिष्ठ, । पांडवांचें बळ उत्कट । आगळें कांहीं दिसतसे. ॥ ११७ ॥ तथापी भीष्म कर्ण द्रोण । यांचे दृष्टी

१. धर्माच्या घराला. २. लग्नसमारंभामध्यें नवऱ्याला एकानें आणि नवरीला एकानें खांद्यावर घेऊन धिंगाणा नाच करण्याचा जो कित्येक स्थळीं देशाचार आहे तो. ३. देणग्यांचे. ४. मंदराचलाला. ५. देवांगनांमध्यें. ६. पार्वती. ७. दिलीं. ८. गणितज्ञ. ९. स्तुतिपाठक. १०. वेतालभक्त, कवि. ११. घोडे. १२. घोड्या. १३. अर्पून. १४. उल्हासानें. १५. स्वतः आला. १६. कृष्ण.

तृणासमान, । हो कां यादवेशीं कृष्ण । थरों न शक्रे संग्रामीं. ॥ ११८ ॥ पांडव स्थापावे निजपदीं । ऐसी कृष्णाची बुद्धी । तया कार्याचिये संधी[1] । विराटनगरीं राहिला. ॥ ११९ ॥ तेंची निरूपण पुढारें । 'उद्योगपर्वीं' सविस्तारें । श्रवण कीजे कां चतुरें । व्यासदेव बोलिले. ॥ १२० ॥ शक्रविधीच्या मस्तकीं । ज्याची पादुका मिरवे निकी, । तो विश्वंभर गुरु पिनाकी । विष्णू आपण विश्वात्मा. ॥ १२१ ॥ तेणें प्रेरिला कवी किंकर । तदाज्ञेनें वदे मुक्तेश्वर, । परिसोत पुढारें करुणाकर । संत माहेर आमुचें. ॥ १२२ ॥ महाराष्ट्रकाव्याचिये पंक्ती । गुरुत्व गौरव इये ग्रंथीं । ऐसा विश्वंभर श्रीमूर्ती । वरद वदे सुवाचा. ॥ १२३ ॥

विराटपर्व समाप्त.



१. निमित्तानें.

